

# बालभारती

## मराठी, इयत्ता तिसरी

शिक्षण-खात्याचा मंजुरी-क्रमांक : पापुमं २२८१ / बा. भा. म. १-स.
दिनांक २५-१२-१९८१



# बालभारती

मराठी, इयत्ता तिसरी






महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ
पुणे

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्ध्य आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

**************************************

## प्रस्तावना

'मातृभाषेमधील बालभारती'च्या नव्या वाचनमालेतील हे इयत्ता तिसरीचे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद होत आहे.

तिसरीचे हे पुस्तक दुसरीच्या 'मातृभाषा-पुस्तका'शी रचनेच्या दृष्टीने मिळते-जुळते व्हावे असा एक विशेष प्रयत्न यात केला आहे. हे पुस्तक शक्यतो निर्दोष व्हावे या हेतूने या पुस्तकाच्या चाचणीप्रती अनुभवी शिक्षक, शिक्षणतज्ज्ञ, प्रशिक्षणसंस्था इत्यादींच्याकडे पाठवून त्यांचे अभिप्राय घेण्यात आले. त्यांनी केलेल्या सूचनांच्या संदर्भात मंडळाच्या मराठी-भाषा-समितीने आवश्यक ते संस्कार करून हे पुस्तक जास्तीतजास्त निर्दोष व अद्ययावत करण्याचा प्रयत्न केला आहे. आस्थापूर्वक घेतलेल्या परिश्रमाबद्दल मंडळ समितीचे आभारी आहे. तसेच, अगत्याने अभिप्राय पाठवून ज्यांनी ज्यांनी या पुस्तकाच्या संपादनास हातभार लावला त्यांचेही मंडळ आभारी आहे.

या पुस्तकाचे अध्यापन प्रभावी होऊन अध्ययन सुलभ व्हावे या दृष्टीने या पुस्तकाची शिक्षकआवृत्ती तयार करून पाठवार मार्गदर्शन करण्यात आले आहे. मंडळाच्या या नव्या उपक्रमाचे शिक्षकमित्र स्वागत करतील अशी अपेक्षा आहे.

पुणे:
१ मे, १९८२
११ वैशाख, १९०४

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ.

**************************************

# अनुक्रमणिका

# १. जमाडी जंमत

आई, एकदा किनई मी खूप खूप गंमत करणार.

मी चिवचिव चिमणी होणार.

हसू नकोस हं!

सकाळी दूध घेतलं की मी अंगणात जाईन. तिथं चिमणी होईन आणि भुर्रकन उडून पारिजातकाच्या झाडावर बसेन.

तू अंगणात येशील तेव्हा मी झाडाच्या पानांत लपेन आणि चिवचिव करीत तुला हाका मारीन —

"चिव-चिव – मी बघ कुठं आहे ? – चिव-चिव -चिव-चिव"...

तू आपली झाडाकडे पाहशील;पण तुला कळणारच नाही. तू म्हणशील, "काय चिवचिवाट चाललाय!"

तू आरशासमोर उभी राहशील. केस मोकळे करून वेणी घालशील. तेव्हा मी भुर्रकन आत येईन आणि आरशातील चिमणीवर टकटक करून उडून जाईन.

तू दचकशील. म्हणशील, "काय ही चिमणी त्रास देत आहे!"

मी आपली खिडकीच्या दारावर बसेन. 'चिव-चिव-चिव-चिव' करत राहीन.



तुला कळणारच नाही, की ही तर आपली बेबीच आहे.

तू स्वयंपाक करायला लागशील ना, तेव्हा मी भुर्रकन उडून तिथं येईन. फिरत राहीन – इकडून तिकडे, तिकडून इकडे,'चिव-चिव-चिव-चिव'करीत.

मी मधूनच तुझ्या डोक्यावरून उडत जाईन. इतक्या जवळून की तुझ्या केसांना माझे पंख लागतील.

तू तर घाबरूनच जाशील.

हात वर करून म्हणशील, "काय मेलीनं उच्छाद मांडलाय!"

मी खूप हसेन — 'चिव-चिव-चिव-चिव.'

तुला कळणारच नाही, की ही चिमणी म्हणजे —



दुपारी तू धान्य निवडत बसशील.तिथंही मी येईन. झर्रकन खाली येऊन पुढ्यातले दाणे चोचीनं टिपीन आणि भुर्रकन उडून जाईन.

तू रागानं मला हाकलायला उठशील. तर मी उंच तारेवर बसून मस्त झोके घेत राहीन. आणि म्हणेन —" चिव-चिव-चिव-चिव — कशी गंमत केली एका माणसाची!"

संध्याकाळी दिवेलागणी झाली की तू मला हाका मारशील, "बेबी, आज दिवसभर बाहेर खेळलीस. आता घरात ये बघू."

मी घरात येईन पण चिमणी म्हणूनच. दिवाणखान्यात येईन आणि तसबिरीच्या चौकटीवर बसून तुझ्याकडे टकमक टकमक पाहत राहीन.

तू म्हणशील, "अजून ही बया इथंच!"

मला बाहेर घालवण्यासाठी तू टाळ्या वाजवशील, शुक् शुक् करशील.

मग मी आणखीन गंमत करीन. मी तसबिरीवरून उठेन आणि वेड्यासारखी या भिंतीपासून त्या भिंतीपर्यंत जोरानं उडायला लागेन... भर्रर्रर्र-भर्रर्रर्र!

तू रागावशील, घाबरशीलही. अन् मोठ्यानं ओरडशील, "बेबी, कुठं आहेस तू? आपली मोठी काठी घेऊन ये पाहू. ही चिमणी आज फारच सतावते आहे!"

मी भुर्रकन उडून बाहेर जाईन आणि काय करीन माहीत आहे? पुन्हा आपली बेबी होईन, नेहमीसारखी. मग काठी घेऊन दिवाणखान्यात धावत येईन आणि म्हणेन, "आई, ही घे काठी. कुठाय ग चिमणी?"

तू इकडे तिकडे पाहशील — तसबिरीवर, कपाटावर, दारावर — पण चिमणी दिसायचीच नाही. तू म्हणशील, " गेली वाटतं बया! "

तुला कळणारच नाही, की ती 'बया' तुझ्यासमोरच उभी आहे. तुला कधी समजायचं नाही, की आपली बेबीच चिमणी झाली होती.





रात्री तुझ्या कुशीत झोपताना मी खूप खूप हसेन.
तू म्हणशील, "का ग हसतेस ?"
पण मी मुळीच सांगणार नाही-आमची ती जमाडी जंमत.

(रवींद्रनाथ टागोर यांच्या काव्यावर आधारित)

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. मुलीने चिमणी बनून कोणकोणत्या गमती करायचे ठरवले ?
२. रात्री झोपताना मी खूप हसेन, असे मुलगी का म्हणाली ?
३. प्राणी व त्यांचे आवाज यांच्या योग्य जोड्या लावा :

| | |
|---|---|
| कावळा | क्व्याक-क्व्याक |
| मेंढी | कुहू-कुहू |
| कोकीळ | घू-घू |
| बदक | काव-काव |
| घुबड | बें-बें |
| | गुटरघू |

४. अशीच बाबांची गंमत करायची तर तुम्ही कोण व्हाल ? आणि काय-काय कराल ?

# २. तीन भावंडे

एका गावात एक शेतकरी राहत असे. त्याला तीन मुलगे होते. थोरल्याचे नाव चिंतु, मधल्याचे नाव संजू आणि धाकट्याला 'राजू' म्हणत. राजूवर वडलांचे प्रेम अधिक होते.

एक दिवस काय झाले, चिंतू आणि संजू वडलांकडे गेले. ते म्हणाले, "बाबा, तुम्ही राजूचे नेहमी गोडवे गाता. आम्हांला मात्र उगाच नावं ठेवता" हे ऐकून बाबा थोडे थांबले. थोडा विचार करून म्हणाले, "जो चांगलं काम करतो त्याचं मी कौतुक करतो. हे पहा, आपण असं करू या— तुम्हा प्रत्येकाला मी सारखे पैसे देतो. आपल्या वाड्यातली एकेक खोलीही मोकळी करून देतो. या पैशांतून प्रत्येकानं आज संध्याकाळपर्यंत आपापली खोली कशानंही भरून काढायची. आम्ही तुमच्या खोल्या पाहू. जो उत्तम रीतीनं खोली भरून काढील त्याला छान बक्षीस देऊ."

चिंतू व संजू म्हणाले, "बाबा, आम्ही तयार आहो."

"ठीक आहे. राजू कुठं आहे ? त्यालाही बोलवा."

राजू जवळच होता.तो आल्यावर बाबांनी चिंतू,संजू व राजू या तिघांना सारखे पैसे दिले व प्रत्येकाला एकेक खोलीही उघडून दिली.

चिंतू खादाड होता. पैसे मिळताच तो आधी बाजारात गेला. जवळ होते तेवढे सगळे पैसे खर्च करून मिठाई घेऊन आला. आणलेली सगळी मिठाई त्याने एकट्यानेच फस्त केली. गोड खाऊन सुस्ती आली. दार लोटून तो डाराडूर झोपून गेला. खोली भरण्याचा विचार त्याच्या मनात आलाच नाही. तो ते विसरूनच गेला.

सजू आपल्या खोलीत बसूनच राहिला. एवढ्या पैशांत ही खोली कशाने भरावी हेच त्याला कळेना झाले. एवढ्यात रस्त्यावरून काही बायका गवताचे भारे डोक्यावर घेऊन चाललेल्या त्याला दिसल्या. त्याला एकदम सुचले. तो म्हणाला, "गवतानंच ही खोली भरून टाकावी. एवढ्या पैशांत तेच शक्य आहे."



त्याने आपल्या पैशांतून गवत विकत घेतले. ते सर्व खोलीभर पसरले. खोली सगळी भरून गेली, याचा त्याला आनंद झाला.

राजूने मात्र आपली खोली उघडताच हातात केरसुणी घेतली. तो स्वतःशी म्हणाला, "केवढा केरकचरा हा! केवढी धूळ!" सगळा कचरा त्याने गोळा केला. जाळ्याजळमटे काढली. जमीन स्वच्छ केली. खोलीतल्या वस्तू नीट लावल्या. शेणाने ज़मीन सारवली. बाज़ारातून त्याने चटई आणली. गांधीजींचा एक फोटो आणला. उदबत्त्या आणल्या.

खोलीच्या एका भिंतीवर गांधीजींचा फोटो लावला. खाली चटई अंथरली. समोर उदबत्त्या पेटवल्या. डोळे मिटून तो प्रार्थना म्हणू लागला.

संध्याकाळ झाली. बाबा पहिल्या खोलीपाशी गेले. चिंतू चांगला घोरत होता. बाबांनी त्याला उठवले. आत सर्वत्र अंधार भरून राहिला होता. बाबा

म्हणाले, " चिंतू, तू तर खोली अंधारानं भरून टाकलीस."

चिंतू अजून आळोखेपिळोखे देत होता.

मग ते संजूच्या खोलीपाशी आले. त्याची खोली पाहून बाबा म्हणाले," वा ! तू तर सगळी खोली गवताच्या पेंढ्या पसरून भरून काढलीस."

संजू म्हणाला, "काढली ना भरून ? मग देणार ना बक्षीस ?"

बाबा म्हणाले, " अरे बक्षीस कसलं ? खोलीभर गवत पसरून तू तर हा जनावरांचा गोठा केलास. दिलेले पैसे असे खर्च केलेस ?"

यावर तो काय बोलणार ? हिरमुसला होऊन तो गप्पच उभा राहिला.

मग त्या दोघांना घेऊन बाबा राजूच्या खोलीत आले. राजू एक अभंग म्हणण्यात रंगून गेला होता —

मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धींचे कारण ॥

गाण्याच्या सुरांनी खोली भरून गेली होती. खोली कशी स्वच्छ दिसत होती. उदबत्त्यांचा सुगंध दरवळत होता. बाबा म्हणाले, "राजू, फारच छान! तू तर गाण्याच्या सुरांनी आणि चंदनाच्या गंधाने सारी खोली भरून टाकलीस, सर्वांची मनं प्रसन्न केलीस."

शब्दार्थ : * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**सुस्ती** – जडपणा; आळस. **हिरमुसणे** – नाराज होणे; विरस होणे. **गोडवे गाणे** – स्तुती करणे. **फस्त करणे** – खाऊन संपवणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. मुलांची परीक्षा पाहण्यासाठी बाबांनी कोणती युक्ती केली ?
२. संजूने खोली कशाने भरून काढली ?
३. चिंतूच्या खोलीत फक्त अंधारच का होता ?
४. राजूची कल्पना सर्वांना का आवडली ?
५. तुम्ही खोली कशी भरून काढली असती ?
६. 'कष्ट' यापासून 'कष्टाळू' असा शब्द तयार होतो. याच तऱ्हेने खालील नवे शब्द तयार करा व त्यांचे एकेक वाक्य सांगा.
   दया, कृपा, झोप, पाय, माया.

# ३. जिकडेतिकडे पाणिच पाणी

जिकडेतिकडे पाणिच पाणी, खळखळणारे झरे,
झुळझुळणारे गवत पोपटी, लवलवणारे तुरे.
नवी लकाकी झाडांवरती,
सुखात पाने-फुले नाहती,
पाउसधारा झेलित जाती भिरभिरती पाखरे.
जिकडेतिकडे पाणिच पाणी, खळखळणारे झरे.
हासत भिजती निळसर डोंगर,
उड्या त्यांतुनी घेती निर्झर,
कडेकपारी रानोरानी नाद नाचरा भरे.
जिकडेतिकडे पाणिच पाणी, खळखळणारे झरे.
मधेच घेता वारा उसळी,
जरा ढगांची तुटे साखळी,
हिरव्या रानी ऊन बागडे हरिणापरि गोजिरे.
जिकडेतिकडे पाणिच पाणी, खळखळणारे झरे.



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**लवलवणारे** – वाकणारे. **निर्झर** – झरा. **कडेकपारी** – डोंगरावरच्या खबदाडीत.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. या कवितेत पावसाळ्यातील अनेक सुंदर दृश्यांचे वर्णन केले आहे. त्यांतील कोणते दृश्य तुम्हांला अधिक आवडते ?

२. खळखळणारे, झुळझुळणारे, लवलवणारे या शब्दांनी कोणाकोणाबद्दल अधिक माहिती मिळते ?

३. खालील शब्दांच्या योग्य जोड्या लावा :

| | |
|---|---|
| डोंगर | पोपटी |
| गवत | नाचरा |
| नाद | गोजिरे |
| | निळसर |

४. खाली दिलेल्या ओळी पुन्हा वाचा आणि डोळ्यांसमोर कोणते चित्र येते ते सांगा :

(अ) पाउसधारा झेलित जाती भिरभिरती पाखरे.

(आ) हिरव्या रानी ऊन बागडे हरिणापरि गोजिरे.

५. पावसाळ्यातील ही दृश्ये उन्हाळ्यात कशी दिसतील ?

(उदाहरणार्थ— खळखळणारे झरे वाहताना दिसणार नाहीत.)



# ४. कहाणी पावसाची

आटपाट नगर होतं. तिथली माणसं होती कष्टाळू. कष्ट फार करायची. खूप धान्य पिकवायची. प्रेमानं वागायची. सुखानं नांदायची.

नदी होती शेजारी, नगराजवळून वाहणारी. डोह होते पाण्यात. मजा वाटे पोहण्यात. पाऊस पडे वेळेवर, पिकं डुलत शेतांवर. शेतं होती अलीकडं, जंगल होतं पलीकडं. जंगलात होते हत्ती, करत दंगामस्ती. नदीवर यायचे, डोहामध्ये डुंबायचे.

पुढं काय झालं —

पाऊस मुळी पडेना. प्यायला पाणी मिळेना. शेतं गेली सुकून, लक्ष्मी गेली रुसून. जंगल झालं वैराण, प्राणी झाले हैराण. ऊन चाललं वाढत. डोह गेले आटत. हत्तीला मिळेना डुंबायला. गेला नदीला विचारायला.

हत्ती नदीला म्हणाला, "गंगामाय, गंगामाय, आता तू वाहत नाहीस. डोहात पाणी साचत नाही. मला डुंबायला मिळत नाही."

नदी म्हणाली, "काय सांगू बाबा तुला? ढग इथं थांबत नाहीत. पाऊस मुळी पडत नाही. पाणी मला मिळत नाही. म्हणून मी वाहत नाही. तू ढगालाच जाऊन विचार."

हत्ती गेला ढगाकडे. तो म्हणाला, "ढगा, ढगा, रुसलास का ? पाऊस तू पाडत नाहीस. नदीला पाणी देत नाहीस. डोहात पाणी साचत नाही. मला डुंबायला मिळत नाही."

ढग म्हणाला, "आम्ही कुठं नाही म्हणतो ? नेहमीप्रमाणं आम्ही येतो. आम्हांला कुणी अडवत नाही. अडवायला तिथं झाडंच नाहीत, म्हणून आम्ही थांबत नाही. जळणासाठी झाडं तोडली. नवी झाडं नाही लावली. तू माणसालाच विचार."

हत्ती गेला माणसाकडे. तो म्हणाला, "तुम्ही जळणासाठी झाडं तोडली. नवी झाडं का नाही लावली ?"

माणूस म्हणाला, "आमच्या हातून चूक झाली. आमची चूक आत्ता कळली. उगाच आम्ही झाडं तोडली. नवी झाडं नाही लावली. म्हणून ढग थांबत नाहीत. पाऊस मुळी पडत नाही. आता आम्ही असं करू. जंगल तोडणं बंद करू. सगळीकडं रोपं लावू. घाम गाळून काम करू. रोपांची चांगली निगा राखू. जंगल झाडांनी भरून काढू. झाडांमुळं गारवा नांदेल. गारव्यामुळं पाऊस पडेल. पावसामुळं डोह भरेल. डोहात खूप डुंबायला मिळेल. धरणांमध्ये पाणी भरेल. पाण्यामुळं वीज मिळेल. वीज यंत्रं चालवील. उद्योगधंदे वाढवील.



जिकडंतिकडं सुख नांदेल. आबादीआबाद होईल."

म्हणून म्हणतो :

उतू नका, मातू नका, झाडं मुळी तोडू नका. झाडं लावणं सोडू नका. घेतला वसा टाकू नका.

ही साठा उत्तरांची कहाणी पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण.

शब्दार्थ :

**आटपाटनगर** – आठ पेठांचे किंवा मोठ्या बाजारपेठेचे शहर. **डोह** – नदीच्या पात्रातील खोल पाण्याचा भाग. **वैराण** – झाडेझुडपे नसलेला प्रदेश. **हैराण** –त्रास-लेला; अस्वस्थ. **उतणे** – गर्वाने फुगणे. **मातणे** – शेफारणे; उन्मत्त होणे. **वसा** – केलेला नेम; घेतलेले व्रत. **आबादीआबाद** – धनधान्याची विपुलता; समृद्धी.

प्रश्न व स्वाध्याय :

१. नगराभोवतालचा परिसर पूर्वी कसा होता ?
२. हत्तीने नदीकडे कोणती तक्रार केली ?
३. हत्ती कोणाकोणाला भेटला ?
४. माणसाच्या हातून कोणती चूक झाली होती ?
५. माणसांनी शेवटी काय करायचे ठरवले ?
६. (अ) 'वाहणे' या शब्दापासून वाह-तो, वाह-त, वाह-णारा, वाह किंवा वहा असे शब्द बनतात. त्याचप्रमाणे 'पाहणे' व 'राहणे' या शब्दांपासून अशा प्रकारचे शब्द बनवून ते वाक्यात वापरा.

(आ) पुढील वाक्ये वाचा :
उतू नका, मातू नका, झाडं मुळी तोडू नका.
झाडं लावणं सोडू नका, घेतला वसा टाकू नका.
ही वाक्ये मोठ्याने वाचताना एक प्रकारचा ठेका किंवा ताल धरल्यासारखे वाटते. अशीच ढब असलेली या पाठातील वाक्ये शोधून ती मोठ्याने वाचा व त्यांतील आनंद लुटा.

# ५. तोडणे सोपे, जोडणे अवघड

भगवान बुद्धांच्या काळातली गोष्ट. एका घनदाट अरण्यात एक दरोडेखोर राहत होता. तो फार दुष्ट होता. लोकांना लुटणे, त्यांचा जीव घेणे याचे त्याला काहीच वाटत नसे. केवळ मजा म्हणूनदेखील तो लोकांची मुंडकी उडवी. कोणाचाही जीव घेण्यात त्याला मोठा आनंद वाटे. त्यामुळे लोक त्याला फार घाबरत. नुसते त्याचे नाव ऐकले तरी ते थरथर कापू लागत.

एकदा काय झाले— भगवान बुद्ध त्या भागात आले. लोकांनी त्यांना परोपरीने विनवले, "महाराज, आपण या अरण्यातून जाऊ नका. या अरण्यात एक दरोडेखोर आहे. तो फार दुष्ट आहे. त्याला कसलीच दयामाया नाही. मागंपुढं न पाहता तो तुमचाही जीव घेईल. आपण मागं फिरावं." हे ऐकून भगवान बुद्धांनी मंद स्मित केले. सर्वांच्याकडे प्रसन्न दृष्टीने पाहिले आणि काही न बोलता शांतपणे ते पुढे निघाले. त्यांना अरण्यात शिरताना पाहून सगळे लोक हळहळले. त्यांना वाटले आता भगवान बुद्ध त्या दरोडेखोराच्या तावडीत सापडणार आणि तो त्यांना ठार मारणार.

थोडे अंतर चालून गेल्यावर दाट अरण्य लागले. भगवान बुद्ध त्या अरण्यातील वाटेने पुढे जात होते. इतक्यात अचानकपणे तो दरोडेखोर त्यांच्यासमोर येऊन उभा राहिला. त्याच्या हातात तळपती नंगी तलवार होती. भगवान बुद्धांना पाहून खाशी शिकार मिळाल्याचा त्याला आनंद झाला. खदखदा हसत तो भगवान बुद्धांकडे रोखून पाहू लागला. भगवान बुद्ध जराही भ्याले नाहीत, की घाबरून मागे सरकले नाहीत. आपल्या जागेवर ते निश्चल उभे होते. त्यांनी शांतपणे विचारले, "तुला काय हवंय ?"

दरोडेखोर म्हणाला, "तुझा प्राण ! "

भगवान बुद्ध बोलले, "माझा प्राण ? म्हणजे तू मला ठार मारणार आहेस ? बेलाशक मार! हा मी तुझ्यापुढं उभाच आहे. पण त्या आधी माझं एक छोटंसं काम करशील का ?"



"काम ? कसलं काम ?"

भगवान बुद्ध म्हणाले, "अगदी साधं, सोपं काम. ह्या समोरच्या झाडाची चार पानं हवी आहेत. तू तोडून आणशील ?"

"एवढंच ना ? माणसांची मुंडकी सपासप तोडणारा मी! मला पानांचं काय ?" असं म्हणून तो झटकन वळला आणि त्या झाडाची चार पाने तोडून घेऊन आला. त्या पानांकडे बघत बुद्ध म्हणाले, "छान! आता अजून एक काम कर अन् मग मला खुशाल ठार मार."

"काय काम ते लवकर सांग."

भगवान बुद्ध म्हणाले, "आता एवढंच कर — ही पानं तू जिथून तोडून आणलीस, तिथंच परत जोडून ये."

दरोडेखोर हसून म्हणाला, "तोडलेलं पान कधी जोडता येतं का ?"

बुद्ध म्हणाले, "मग भल्या माणसा, तोडलेलं पान जर जोडता येत नसेल, तर मग घेतलेला प्राण परत देता येईल का ? जे आपल्याला जोडता येत नाही ते

आपण तोडावं कशाला ? तोडणं सोपं, जोडणं अवघड. ज्याला जोडता येत नाही त्याला तोडण्याचा अधिकार काय ?"

भगवान बुद्धांचे हे बोल ऐकून तो चपापला. तोडणं सोपं जोडणं अवघड' हे शब्द पुन्हा पुन्हा त्याच्या कानांत घुमू लागले.त्यापाठोपाठ आजवर कापलेली मुंडकी त्याच्या डोळ्यांपुढे येऊ लागली. तसेच ठार केलेल्या लोकांच्या किंकाळ्यांनी त्याचे कान बधिर झाले. तो भगवान बुद्धांकडे पाहतच राहिला. प्रसन्न हसून बुद्ध म्हणाले, "भल्या माणसा, सोपं काम करण्यात कसलं शौर्य, कसली बहादुरी ? असं काहीतरी कर की ज्यामुळं तुलाच काय पण सर्वांना अभिमान वाटेल."

हे ऐकताच त्याच्या हातातील ती तळपती नंगी तलवार गळून पडली. मस्तक आपोआपच नमले. भगवान बुद्धांचे विचार त्याच्या मनावर पक्के कोरले गेले. त्या दिवसापासुन लोकांना लुबाडणे,ठार मारणे त्याने कायमचे सोडून दिले.



**शब्दार्थ :** ******* ***********************

**घनदाट** - अतिशय दाट; निबिड. **स्मित** - गालातल्या गालात हसणे. **हळहळणे** - वाईट वाटणे; हुरहुर वाटणे. **खाशी** - नामी; उत्तम. **निश्चल** - न हलणारा; स्तब्ध. **चपापणे** - दचकणे. **तळपणे** - चकाकणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. दरोडेखोराला लोक का घाबरत ?
२. लोकांनी भगवान बुद्धांना कोणती विनवणी केली ?
३. भगवान बुद्धांनी दरोडेखोराला कोणते काम सांगितले ?
४. दरोडेखोराच्या कानांत कोणते शब्द घुमत राहिले ?
५. दरोडेखोराच्या जीवनात कोणता कायमचा बदल झाला ?

६. (अ) जोड्या लावा : खाशी — स्मित
घनदाट — हसणे
सपासप — अरण्य
खदखदा — शिकार
दुष्ट — तोडणे
मंद — दरोडेखोर

(आ) विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा : जसे :- तोडणे-जोडणे.
भला, अवघड, आनंद, शांत, आधी.

(इ) समानार्थी शब्द लिहा : जसे : - अवघड-कठीण.
दुष्ट, प्रसन्न, प्राण, शौर्य.

७. बुद्ध व दरोडेखोर यांच्यामध्ये जो संवाद झाला तो नाट्यरूपाने वर्गात करून दाखवा.

# ६. शाहूमहाराज

गोष्ट आहे शाहूमहाराजांची.

ते भर उन्हाळ्याचे दिवस होते. दुपारच्या जेवणाची सुटी झाली. राजवाड्यातले आणि जवळपासच्या सरकारी पागेतले सगळे नोकरचाकर एकत्र आले. दुपारच्या वेळी खाण्यासाठी बांधून आणलेली भाकरी त्यांनी सोडली. उन्हाळ्यामुळे दोन घास पोटात गेल्याबरोबर तहान लागू लागली. पाण्याविना घास गिळत नव्हता. काही लोक जवळच्या हौदावर जाऊन पाणी पिऊ लागले. पण गंगाराम कांबळे याला मात्र प्रश्न पडला होता— आपण कसं त्या हौदाचं पाणी प्यायचं ? नळ सोडून पाणी घेतलं तर त्या हौदाला शिवल्यासारखं होईल.

मनात चलबिचल सुरू झाली. तहान तर लागलेली. घास गिळत नव्हता. जीव व्याकुळला. मग मात्र त्याला राहवेना. धाडस करून तो उठला. त्याने नळ सोडला. एवढ्यात कुणीतरी पाहिले. लगेच आरडाओरडा सुरू झाला. जेवायला बसलेले सगळे नोकरचाकर त्याच्या अंगावर धावून गेले. त्यांचा राग अनावर झाला. त्या सगळ्यांनी मिळून त्याची पाठ फोडून काढली.



गंगाराम बिचारा महाराजांचा धावा करू लागला. आरडाओरडा थांबला. मारहाण बंद झाली.

गंगाराम काकुळतीला येऊन महाराजांकडे गेला. त्याच्या अंगावरच्या कपडयांच्या चिंध्या झाल्या होत्या. मार खाऊन तोंड सुजल्यासारखे दिसत होते. महाराजांनी त्याला पोटाशी धरले. त्यांचा जीव गलबलला. त्याच्या पाठीवरून मायेने हात फिरवत त्यांनी लोकांच्याकडे बघितले. महाराज त्यांना काही बोलले नाहीत. पण पोटाशी धरलेल्या गंगारामला ते म्हणाले, "गंगाराम, आजपासून मी तुला नोकरीतून मोकळा करतो. तू स्वतंत्र धंदा कर. त्यासाठी जो पैसा लागेल तो मी देईन. तू असं कर – आपल्या कोल्हापुरात एक हॉटेल काढ."

असे म्हणून मुद्दाम लोकांच्याकडे बघत महाराज म्हणाले, "पाण्याचा कसा विटाळ होतो तेच बघायचंय मला."

बोलल्याप्रमाणे महाराजांनी त्याला नोकरीतून मोकळे केले. चांगले हॉटेल काढण्यासाठी स्वत: त्याला पैसे दिले. भर वस्तीत त्याने एक मोठे हॉटेल काढले. ते चांगले सजवले. गंगारामचे हे हॉटेल हा सगळ्यांच्या चर्चेचा विषय झाला. लोक आपापसांत बोलू लागले, "कांबळे नावाच्या माणसानं काढलेलं हे हॉटेल चालणार कसं ? कोण जाणार त्या हॉटेलात ?"

लोकांच्या कल्पनेप्रमाणे खरोखरच त्या हॉटेलात कोणी जाईना. शिवाशीव होईल ही कल्पना अजून लोकांच्या मनातून गेली नव्हती. हॉटेल छान सजवले होते. जिकडेतिकडे टापटीप होती. पदार्थही सगळे स्वच्छ होते. पण वाण होती ती गिऱ्हाइकांची. हॉटेल चालणार कसं ? — हा गंगारामला प्रश्न पडला.

गंगारामचा हा प्रश्न महाराजांनी बरोबर ओळखला. त्याची अडचण त्यांच्या लक्षात आली. मग त्यांनी एक युक्ती केली. ते स्वतःच रोज राजवाड्यातून बाहेर पडले की या हॉटेलवर यायचे. चार घोड्यांची महाराजांची टमटम त्या हॉटेलसमोर नित्यनियमाने उभी राहू लागली. टमटम आली की लोक गर्दी करायचे. महाराज स्वत: तिथे चहा-कॉफी घ्यायचे आणि आपल्याबरोबर लोकांनाही प्यायला लावायचे. महाराज कधी एकटे यायचे नाहीत. मोठमोठे अंमलदार, सरदार, इनामदार अशी मंडळी त्यांच्याबरोबर असायची. समाजातली अशी मोठी माणसे या हॉटेलमध्ये महाराजांबरोबर येऊ लागली, तसे इतर लोकही तिथे जाऊ लागले. गंगारामचा प्रश्न आपोआपच नाहीसा झाला.

थोड्याच दिवसांत गंगाराम कांबळे यांचे हॉटेल चांगले चालू लागले. समाजातल्या सगळ्या जाति-धर्मांतले लोक त्या हॉटेलात जाऊ लागले. गंगाराम कांबळे एक प्रतिष्ठित व्यक्ती म्हणून समाजात वावरू लागले. एका उन्हाळ्यात राजवाड्यावर घडलेला तो प्रसंग वरदान ठरला. त्या पाण्याने गंगारामच्या पोटापाण्याचा प्रश्न कायमचा मिटवला. कोल्हापुरातील या हॉटेलात कोणालाच पाण्याचा विटाळ होईनासा झाला.

शाहूमहाराजांनी अस्पृश्यता निवारण्याच्या दृष्टीने अशा अनेक गोष्टी केल्या. कोल्हापूर संस्थानात एक हुकूम काढला. सरकारी अगर सार्वजनिक ठिकाणच्या विहिरी आणि पाणवठे सगळ्यांसाठी खुले केले. या पाण्याचा उपयोग करताना जर कोणी शिवाशीव मानू लागले तर तो गुन्हा समजला जाईल व त्याला शिक्षा होईल, अशी दवंडी पिटवली.

त्या काळात महाराजांनी केलेली ही कामगिरी किती मोलाची होती नाही का ?

**शब्दार्थ** : * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**भर उन्हाळा** – ऐन उन्हाळा. **पागा** – तबेला; घोडे बांधायची जागा. **व्याकूळ** – कासावीस. **अनावर** – न आवरता येण्यासारखा. **धावा करणे** – संकटाच्या वेळी मदतीसाठी विनवणी करणे. **काकुळतीला येणे** – दयेची याचना करणे. **वाण** – कमतरता. **टमटम** – बगी; चार चाकी घोडागाडी. **वरदान** – देणगी. **दवंडी पिटणे** – डांगोरा; प्रसिद्धी; एखादी वार्ता, खबर गावातील सगळ्या लोकांना कळवण्यासाठी वाद्याचा आवाज करून मोठ्याने सांगणे.

**प्रश्न व स्वाध्याय** :

१. लोकांनी गंगारामला का मारले ?
२. हॉटेल काढण्याची कल्पना त्याला महाराजांनी का सुचवली ?
३. गंगारामचे हॉटेल चालावे म्हणून महाराजांनी कोणती युक्ती केली ?
४. अस्पृश्यता निवारण्यासाठी महाराजांनी कोणत्या गोष्टी केल्या ?
५. (अ) या पाठात 'ते भर उन्हाळ्याचे दिवस होते' असे वाक्य आहे. 'भर' हा शब्द वापरून काही नवी वाक्ये तयार करा.

(आ) 'पाण्याचा कसा विटाळ होतो तेच बघायचंय मला.' यातील 'बघायचंय' हा शब्द 'बघायचे आहे' या दोन शब्दांचा मिळून तयार झाला आहे. त्याचप्रमाणे पुढे दिलेल्या दोन शब्दांचा एक शब्द तयार करून त्यांचा वाक्यात उपयोग करा : करायचे आहे, सांगायचे आहे, जायचे आहे, बसतो आहे, जातो आहे, केले आहे, लिहिले आहे.

## ७. झुले बाई झुला . . .

झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.
सकाळच्या उन्हात या झोके घेऊ चला.

हिरव्या हिरव्या फांदीला ग,
झुला माझा बांधिला ग,
आता होता भुईवर, भेटे आभाळाला.
झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.

उंच उंच जाते मी ग,
झुल्यासंगे गाते मी ग,
गाता गाता वाऱ्याने या झोका मला दिला.
झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.

जिथे जिथे झुला झुले
तिथे तिथे सारी फुले.
झुल्यासंगे झुला, बाई, फुलासंगे फुला.
झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.

झुला झाला अनावर,
जीव माझा खालीवर.
माया याची माझ्यावर, सांभाळतो मला.
झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.

झुला माझा पाखरू ग,
वाऱ्याचे हे लेकरू ग.
एक झोका मला आणि एक झोका तुला.
झुले बाई झुला, माझा झुले बाई झुला.



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

अनावर - न आवरता येणारा, स्वैर.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. झोका खाली येतो नि लगेच उंच जातो हा अर्थ कवितेतील कोणत्या ओळीचा आहे ?
२. झुल्याची मुलीवर माया आहे हे कोणत्या ओळीवरून समजते ?
३. मुलीने झुल्याला पाखरू का म्हटले आहे ?
४. झाडाला बांधलेल्या झुल्याचे चित्र काढा.

# ८. मुळांची तक्रार

एका रोपट्याच्या मुळांची रोज सारखी कुरकुर चालली होती. त्यामुळे कोणाच्याही मनाला समाधान नव्हते. ना फुलांना, ना पानांना, ना देठांना. रोपटे मात्र बिचारे खिन्न होते.

कुरकुर करत मुळे म्हणत, "तुम्ही सगळ्यांनी मारे या मोकळ्या हवेत हसावं, खेळावं आणि आम्ही मात्र सदानकदा जमिनीत तोंड खुपसून गाडून घ्यावं. आम्हांला नाही वाटतं हौस – तुमच्यासारखी मोकळ्या हवेत खेळायची ? "

हे ऐकताच रोपट्याचा एक देठ म्हणाला, "मोकळ्या हवेत ? येऊन पहा ना! उन्हाची चपराक बसली म्हणजे भोवळ येईल भोवळ! एका दिवसात तुमची तोंड सुकून जातील."

लगेच दुसरा देठ म्हणाला, " तुम्हांला आमची नुसती मोकळी हवा दिसते. वर येऊन बघा. ऊन लागलं म्हणजे म्हणाल, "नको रे बाबा ही मोकळी हवा!"

हे ऐकून मुळे संतापली. एक मूळ म्हणाले, "नेहमी असंच म्हणा आणि आम्हांला कायम मातीत गाडून ठेवा."

लगेच दुसरे मूळ बोलले, " बरं, या मातीत तरी आम्हांला काही घटकाभर विश्रांती आहे का ? तुम्हांला अन्न कसं मिळेल, पाणी कसं मिळेल याची काळजी आम्हांलाच. तुमच्यासाठी रात्रंदिवस आम्ही असं राबावं आणि तुम्ही मात्र वर मजा मारावी ! "

खाली वाकून पाने म्हणाली, "अहाहा ! म्हणे रात्रंदिवस राबता ! आणि आम्ही काय नुसती मजा मारतो ? तुम्ही जमिनीतून जेवढं अन्न पुरवता तेवढंच आम्ही उन्हातून पुरवतो. आम्ही काही नुसती मजा मारत नाही म्हटलं ! "

लगेच फुलांनीही मध्ये तोंड घातले. ती मुळांना म्हणाली, "बाबांनो, या अशा भांडणानं कुणाचं बरं झालंय ? खरं बोलायचं, तर आपण सगळेच काम करतो."

मुळांना हे पटले नाही. ती म्हणाली, "ते काही नाही. जन्मभर आम्ही काय

जमिनीत गाडूनच घ्यावं ? आमच्या जिवावर तुमची चंगळ. काही झालं तरी आम्ही जमिनीवर येणार."

बिचारी फुलं म्हणाली, "आमचं पटत नाही तर काय करणार ? या बापड्यांनो, घ्या विषाची परीक्षा. जशी तुमची इच्छा!"

मुळांची ती इच्छा पूर्ण होण्याचा योग लवकरच जुळून आला. एके दिवशी त्या रोपट्याभोवती माळी आळे करत होता. चुकून त्याच्या हातून रोपट्याची मुळे उघडी पडली. मुळांना फारच आनंद झाला. बिचाऱ्या रोपट्याला मात्र फार वाईट वाटले. ते तळमळून मनातल्या मनात म्हणाले, " अरेरे! बाळांनो, आता तुमचं कसं होणार ?"

मुळे आपल्याच आनंदात रंगून गेली. रोपट्याच्या पानांकडे, फुलांकडे, देठांकडे बघून ती हसू लागली. अर्थात त्यांचे हे हसणे फार काळ टिकले नाही. थोड्याच वेळात सूर्य वर आला. सकाळचे गोड कोवळे ऊन जाऊन कडक ऊन पडले. उन्हाचा चटका मुळांना जाणवू लागला. मुळे हाशहुश्श करू लागली. त्यामुळे पाने, फुले सुकू लागली. ती एकमेकांना म्हणू लागली, "झालं! संपलं आता आपलं आयुष्य! "





पानांची, फुलांची, देठांची आणि मुळांची ही अवस्था त्या रोपट्याला पाहवेनाशी झाली. रोपटे कळवळून म्हणाले, "बाळांनो, हे काय केलंत ? आपापसांत भांडून तुम्ही काय मिळवलंत ?"

थोड्याच वेळाने सूर्य माथ्यावर आला. भर दुपारच्या उन्हाने मुळांची लाही लाही होत होती. त्यांच्या तोंडून शब्दही फुटत नव्हता. एक थोराड मूळ कसेबसे म्हणाले, "आमची चूक कळली. जे करायला नको होतं ते आम्ही करून बसलो. पण आता इलाज काय ?"

रोपटे म्हणाले, " बाळांनो, आजचा दिवस गेला म्हणजे संकट टळेल. उद्या सकाळी माळी आला म्हणजे जाईल त्याचं लक्ष तुमच्याकडं. आजचा दिवस तेवढा धीरानं काढा."

रोपट्याचा तो बोल खरा ठरला. दुसऱ्या दिवशी सकाळी माळीदादा आला. उघडी मुळे बघताच त्याने त्यांच्यावर मातीचे पांघरूण घातले. वर थोपटल्यासारखे केले. पोटभर पाणी प्यायला दिले. मुळांना हायसे वाटले.

त्या दिवसापासून मुळांनी कसली तक्रार म्हणून केली नाही.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**खिन्न** – दुःखी. **भोवळ** – घेरी. **गाडणे** – पुरणे. **राबणे** – कष्ट करणे. **चंगळ** – चैन; मजा. **योग जुळून येणे** – चांगली संधी लाभणे; अनुकूल वेळ येणे. **आळे** – मुळांना पाणी मिळण्यासाठी रोपाच्या बुडाशी केलेला गोलाकार खळगा. **थोराड** – जाडजूड; वयाच्या मानाने मोठ्या अंगाचा. **लाही लाही होणे** – आग आग होणे. **विषाची परीक्षा घेणे** – विनाकारण जीव धोक्यात घालणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. मुळांची तक्रार कोणती होती ?
२. मुळांची समजूत काढण्याचा कोणी कोणी प्रयत्न केला ?
३. सर्वांनी एकोप्याने राहण्यातच फायदा आहे, नाहीतर तोटा होतो, हे या पाठातील कोणत्या गोष्टीवरून दिसून येते ?
४. (अ) खालील शब्दांचे समानार्थी शब्द द्या :
जमीन, फूल, सूर्य, भांडण.
(आ) खालील शब्दांचे विरुद्धार्थी शब्द द्या:
कोवळे, आनंद, गोड, खिन्न, ऊन.
(इ) (१) विषाची परीक्षा घेणे.
(२) योग जुळून येणे.
(३) लाही लाही होणे.
यांचा उपयोग करून काही वाक्ये लिहा.

# ९. ईद मुबारक

सूर्य मावळला. सलीम आपल्या घराच्या गच्चीवर गेला. गच्चीत उभा राहून तो आकाशाकडे पाहत राहिला. त्याची नजर चंद्रकोर शोधू लागली. तो एकटक बघत राहिला. काही वेळ गेला आणि एकाएकी त्याने आनंदाने टाळी वाजवली. मोठमोठ्याने हाका मारून अम्मी आणि दिदी यांना बोलावले. सलीमच्या हाका ऐकताच त्या दोघीही लगबगीने वर आल्या. सलीमने त्यांना चंद्रकोर दाखवली. ती पाहून त्यांना फार आनंद झाला. चंद्राकडे बघत त्यांनी दुवा मागितला.

चंद्रदर्शन झाल्यामुळे दुसऱ्या दिवशी ईद साजरी होणार होती.



सलीमच्या घरातही ईदची तयारी झाली होती. सलीमची तर चंगळच होती. नवा सदरा, नवी विजार, नवे मोजे, नवे बूट, सारे काही नवे नवे. त्याच्या वडलांनी दिदी आणि अम्मी यांच्यासाठीही नवे कपडे आणले होते. ईदचा दिवस कधी उगवतो असे सलीमला झाले होते.

भल्या पहाटेच सलीम खडबडून जागा झाला. अब्बा, अम्मी आणि दिदी अगोदरच उठले होते. सगळ्यांच्या अंघोळी झाल्या. नवे कपडे घातले. सर्वांनी अत्तर लावले. डोळ्यांत सुरमा घातला. सलीम वडलांबरोबर इदग्याकडे निघाला.

नमाज पढण्यासाठी सगळे मुस्लिम बांधव इदग्यावर जमले होते. थोड्याच वेळात शांतता पसरली. नमाज झाली. सगळ्यांच्या कल्याणासाठी परमेश्वराला दुवा मागितला. ईदची ही नमाज संपल्यावर सर्वजण एकमेकांना भेटून ' ईद मुबारक ' म्हणू लागले. शुभेच्छा देऊ लागले. अब्बा आणि सलीम आपले नातेवाईक आणि इष्टमित्र यांना भेटून घरी परतले.

सलीमने आपल्या गुरुजींना आणि मित्रांना ईदसाठी घरी बोलवले होते. तो त्यांचीच वाट बघत होता. ते येताना दिसताच त्याला आनंद झाला. ' गुरुजी आले, गुरुजी आले,' असे त्याने अब्बांना सांगितले. पुढे होऊन अब्बांनी त्या सर्वांचे स्वागत केले. गुरुजींबरोबर त्याच्या वर्गातील संजय, रमेश, सरिता हे मित्रही आले होते. आल्याआल्या त्या सर्वांनी सलीम आणि त्याच्या घरच्या मंडळींना ' ईद मुबारक असे म्हणून शुभेच्छा दिल्या.

सगळे बैठकीवर बसले. लगेच सलीम पुढे झाला. त्याने सर्वांना अत्तर लावले. तोवर सलीमची अम्मी आणि दिदी यांनी तबकातून काचेचे नक्षीदार छान वाडगे आणले. दिदीने ते सर्वांच्या हाती दिले आणि अम्मी म्हणाली, "हा शीरखुर्मा आमच्या नसीमदिदीनं केला आहे बरं!"

सरिता म्हणाली, "अय्या! यात शेवयादेखील आहेत!"

हे ऐकताच नसीम बोलली, "केवळ शेवयाच नाहीत. दूध, साखर, सुकामेवाही आहे."

संजयने विचारले, "शीरखुर्मा हा पदार्थ खास रमजान ईदलाच करतात वाटतं ?"

सलीमचे अब्बा बोलले, "बरोबर आहे. शीरखुर्मा हा रमजान ईदचा खास पदार्थ."

हे ऐकून रमेश म्हणाला, "म्हणजे आम्ही गणेशचतुर्थीला मोदक करतो, तसा हा तुमचा खास पदार्थ दिसतो!"

सगळ्यांना समजावून सांगत गुरुजी म्हणाले," वेगवेगळ्या सणाला वेगवेगळे पदार्थ करतात. जसा रमजान ईदला शीरखुर्मा करतात, तसा नाताळला केक बनवतात."

सरिताने विचारले," पण रमजान ईद हे नाव कशावरून पडलं ?"

खुलासा करत अब्बाजान म्हणाले, "रमजान हा आमचा उपासाचा महिना. या महिन्यात आम्ही उपास करतो. त्याला 'रोजा' म्हणतात. हे रोजे फार कडक असतात. हा महिना संपताच चंद्रदर्शन झाले, की दुसऱ्या दिवशी आम्ही ईद साजरी करतो. हीच रमजान ईद."

सरिता म्हणाली, "ईद म्हणजे मग सण का ?"

अब्बा म्हणाले, "अर्थात."

एवढ्यात शीरखुर्मा घेऊन पुन्हा अम्मी आल्या आणि म्हणाल्या," हे काय, खायचं सोडून तुम्ही सगळे बोलतच बसलात ? शीरखुर्मा घ्या ना!" आग्रह



करून त्यांनी प्रत्येकाला शीरखुर्मा वाढला.

गप्पागोष्टी करत सगळेजण शीरखुर्मा खाऊ लागले. एवढ्यात आणखी काही मंडळी आली. तसे आटोपते घेऊन गुरुजी व वर्गमित्र जायला उठले. निरोप घेण्यापूर्वी त्यांनी पुन्हा एकदा 'ईद मुबारक' असे म्हणून शुभेच्छा दिल्या.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**अम्मी** - आई. **दिदी** - थोरली बहीण. **अब्बा** - वडील. **दुवा** - आशीर्वाद. **नमाज** - प्रार्थना. **पढणे** - पाठ म्हणणे; वाचणे. **इदगा** - ईदच्या दिवशी सामुदायिक प्रार्थनेसाठी गावाबाहेर मोकळ्या जागेत उभारलेली भिंत.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. चंद्रकोर पाहून सर्वांना आनंद का झाला ?
२. ईदचा दिवस कधी उगवतो असे सलीमला का झाले होते ?
३. सलीमच्या घरच्या मंडळींनी ईदच्या दिवशी सकाळी कायकाय केले ?
४. खाली दिलेले सण आणि पदार्थ यांच्या योग्य जोड्या जुळवा :

| | |
|---|---|
| नाताळ | शीरखुर्मा |
| गणेशचतुर्थी | केक |
| संक्रांत | मोदक |
| ईद | तिळगूळ |
| होळी | लाह्या |
| नागपंचमी | पुरणपोळी |

५. तुम्ही साजरा केलेला एक सण सांगा व त्या दिवशी कोणकोणत्या गोष्टी केल्या त्या लिहा.
६. पुढे दिलेल्या प्रसंगी आपण कोणत्या शब्दांत शुभेच्छा व्यक्त करतो ?
परीक्षेला जाताना, वाढदिवसाला, नव्या वर्षाच्या आरंभी, मुलांना ओवाळताना, प्रवासास निघताना.
७. खाली दिलेल्या शब्दांचा योग्य क्रम जुळवून स्वतंत्र वाक्ये तयार करा :
(१) शीरखुर्मा (२) चंद्रदर्शन (३) भल्या सकाळी उठणे.
(४) ईद मुबारक देणे. (५) इदग्यावर जाणे.
८. सलीमच्या घरी गुरुजी व मित्र आल्यानंतर त्यांच्यात जो संवाद झाला तो नाट्यरूपाने वर्गापुढे सादर करा.

# १०. घाटातली वाट

घाटातली वाट,
काय तिचा थाट!
मुरकते, गिरकते,
लवते पाठोपाठ.

निळी-निळी परडी
कोणी केली पालथी?
पानं-फुलं सांडली
वरती आणि खालती.

खाली खोल दरी,
वर उंच कडा,
भला मोठा नाग जणू
उभा काढून फडा.

भिऊ नका कोणी,
पाखरांची गाणी,
सोबतीला गात गात
खळाळतं पाणी.

घाटातली वाट,
काय तिचा थाट!
गाणी म्हणू, टाळ्या पिटू,
जाऊ रुबाबात.



**शब्दार्थ :**

**मुरकणे** – मुरडणे. **गिरकणे** – गिरकी घेणे; स्वतःभोवती फिरणे.
**परडी** – छोटी टोपली.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. घाटातील वाट नागमोडी आहे असे कवितेतील कोणत्या ओळींवरून कळते ?
२. 'निळी-निळी परडी', 'भला मोठा नाग' या ओळी कोणाला उद्‌देशुन म्हटल्या आहेत ?
३. पाठोपाठ, जागोजाग अशांसारखे आणखी काही शब्द लिहा.

# ११. चतुर बकरी

एका गावात एक मेंढपाळ राहत होता. त्याच्याजवळ पुष्कळ मेंढ्या आणि बकऱ्या होत्या. तो रोज त्यांना रानावनात चरायला घेऊन जाई.

असाच तो एकदा लांब रानावनात गेला. त्याच्या कळपात एक लहान बकरी होती. ती होती मोठी खोडकर आणि चतुर. कळपाबरोबर न राहता ती आडबाजूला गेली. चरता चरता तिथेच रमली. दिवस मावळला. अंधार पडू लागला आणि मग तिच्या लक्षात आले, की आपण एकटेच मागे राहिलो आहोत. तिने इकडे-तिकडे पाहिले. आजूबाजूला कोणीच दिसेना झाले. रानावनात आपण एकटेच सापडलो आहोत हे लक्षात येताच ती थोडी घाबरली. पण तशी ती धीट होती. त्यामुळे तिने धीर सोडला नाही.

थोड्याच वेळात चंद्र उगवला. थोडे थोडे दिसू लागले. एवढ्यात कसलीशी हालचाल जाणवली. जरा पुढे होऊन तिने कानोसा घेतला. जवळच एक तळे दिसले. काही जनावरे पाणी पीत होती. त्यांना बघताच ती थबकली. त्या जनावरांत लांडगा दिसताच ती घाबरली. आपला जीव वाचवण्यासाठी एका झुडपाआड ती उभी राहिली.

थोडा वेळ जातो न जातो इतक्यात इकडेतिकडे बघत लांडगा तिच्या समोरच आला. पळून जाण्याचीही चोरी झाली. बकरीला बघताच लांडगा खूश होऊन म्हणाला, "वा! आज झकास मेजवानी मिळणार! मी तुला खाणार."

आधीच भ्यालेली बकरी आणखी घाबरली. परंतु न डगमगता ती चतुराईने म्हणाली, "तू खुशाल खा. पण तुझ्या आधी मला इथं बसवून वाघोबा तळ्यावर गेलेत. आणि जो कोणी येईल त्यालाही इथं बसवून ठेव, असं सांगून गेलेत. तेव्हा तूही थांब कसा."

लांडगा घाबरून म्हणाला, "वाघोबा असं सांगून गेले ?"

बकरी म्हणाली, "हो तर! येतीलच इतक्यात. ये, बैस, बैस."

"बैस काय ? वेडी का शहाणी! मी आपला दुसरीकडंच जातो कसा." असे म्हणून लांडग्याने पळ काढला.

'चला, एक संकट तर टळलं!' असे बकरी मनात म्हणते न म्हणते तोच समोरून येताना कुणीतरी दिसले. पाहते तर समोर वाघ! भीतीने तिची गाळणच उडाली. आता लपणार तरी कुठे ? जाणार तरी कुठे ? तिच्या रोखाने संथ पावले टाकत वाघोबा मोठ्या दिमाखात येत होते. तिला पाहून वाघाचे डोळे लकाकले. मोठ्या खुशीने तो म्हणाला, "वा! आज झकास मेजवानी मिळणार! मी तुला खाणार."

तो खाणार यात शंकाच नव्हती. पण सगळा धीर एकवटून ती म्हणाली, "महाराज, आपण मला खुशाल खा. पण मग..."

एक डरकाळी फोडून तो म्हणाला, "पण मग काय ?"

अधिकच नेटाने ती बोलली, "आता सांगू तरी कसं ? हे पहा, तळ्यावर पाणी प्यायला वनराज गेलेत. ते येतीलच इतक्यात. मला बसवून गेलेत."

"कोण ? वनराज ! म्हणजे सिंह ? " असे वाघाने विचारले.

त्यावर ती कशीबशी म्हणाली, "हो...हो ना, सिंह! हे बघा ना त्यांच्या पायाचे ठसे."

ठसे म्हटल्याबरोबर नुकत्याच एका वनराजाशी केलेल्या झगड्याचा प्रसंग त्याला आठवला. अंगावरच्या त्या जखमाही अजून पुरत्या बऱ्या झाल्या नव्हत्या. तो स्वतःशी म्हणाला, "नको रे बाबा, पुन्हा झगडा नको! " आणि असे म्हणून त्याने काढता पाय घेतला.



"सुटले एकदाची!" असे म्हणून बकरी सुटकेचा श्वास सोडणार तोच खुद्द वनराज स्वतः ची प्रचंड आयाळ झुलवत तिच्या पुढ्यात येऊन हजर! बकरी मनात चरकली. काय करावे या विचाराने गोंधळून गेली. वनराज मात्र जिभल्या चाटत म्हणाला, "वा! आज झकास मेजवानी मिळणार! मी तुला खाणार."

बकरी कशीबशी म्हणाली, "महाराज, आपण खुशाल खा. पण मग..."

एक डरकाळी फोडून वनराज म्हणाले, "पण मग काय ?"

ती बोलली, " आता सांगू तरी कसं ? हे पहा– तळ्यावर शिकारी पाणी प्यायला गेलेत."

' शिकारी ' हा शब्द कानावर पडताच वनराज गडबडले.

"कोण शिकारी ?"

" साधे नाहीत महाराज, बंदूकधारी! "

"काय म्हणतेस! " वनराजांचा आवाज खाली आला.

ती चढ्या आवाजात बोलली, "होय महाराज. तुमची शिकार करता यावी म्हणून त्यांनी मला मुद्दाम इथं आणलंय. मला खायला म्हणून तुम्ही येणार आणि त्यांना आयती शिकार साधणार."

वनराज स्वतः शीच म्हणाले, "अरे बापरे! असा डाव आहे तर!" आणि पुढचे बोलायला ते तिथे राहिले नाहीत. हां हां म्हणता त्यांनी धूम ठोकली. बकरीने सुटकेचा श्वास सोडला, आणि थोड्याच वेळात दिवस उगवला



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**मेजवानी** थाटामाटाचे भोजन. **दिमाख** - डौल; तोरा. **कानोसा घेणे** - कान लावून ऐकणे; चाहूल घेणे. **काढता पाय घेणे** - माघार घेणे; निघून जाणे. **धूम ठोकणे** - जोराने पळून जाणे. **जिभल्या चाटणे** - खाण्याची तीव्र इच्छा होणे; उतावीळ होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. लांडग्याच्या तावडीतून बकरीने आपली सुटका कशी करून घेतली ?
२. वाघाने काढता पाय का घेतला ?
३. वनराजाने धूम का ठोकली ?
४. (अ) ' रानावनात ', ' मेंढ्याबकऱ्या ' यांसारखे आणखी काही शब्द सांगा.
(आ) ' चतुर ' पासून ' चतुराई ' असा शब्द तयार होतो. याप्रमाणे खालील शब्दांपासून नवे शब्द तयार करा :
धीट, महाग, चपळ, स्वस्त, दांडगा.
(इ) 'पळून जाण्याची चोरी होणे' म्हणजे उघडपणे पळता न येणे. 'चोरी होणे' हे शब्द वापरून अशी आणखी काही वाक्ये तयार करा.
५. शिक्षकांच्या मदतीने ही गोष्ट संवादरूपाने वर्गापुढे सादर करा.

# १२. जिद्द

एका अपंग मुलाची ही गोष्ट. या मुलाचे नाव आहे –बाळू गुंडू गिलबिले. जन्मत:च त्याला डावा हात अजिबात नाही. उजवा हात आहे तोही फक्त कोपरापर्यंतच. त्या कोपरालाच बोटाचे एक पेर आहे.

अशा या मुलाचे कसे होणार, याची ज्याला त्याला काळजी. लहानगा बाळू कुशीवर वळू लागला, पालथा होऊ लागला. पण हाताचा आधार नसल्याने त्याला पुढे सरकता येईना, रांगता येईना. दुसऱ्याच्या मदतीशिवाय बसता येईना.



पण बाळू मोठा जिद्दीचा! हाताची कामे तो पायांनी करू लागला. हळूहळू एकएक गोष्ट त्याला जमू लागली. त्याची ही धडपड पाहून बाळूची आजी त्याला मदत करू लागली. हळूहळू तो बसायला शिकला, उभा राहू लागला, पावले टाकू लागला. त्याचा हुरूप वाढू लागला.

बाळूच्या बरोबरीची सारी मुले शाळेत जाऊ लागली. त्याच्या मनात आले, आपणही शाळेत जावे. हात नसल्यामुळे त्याला शाळेत घातले नव्हते. तरीही आपणहून तो मुलांच्याबरोबर शाळेत जाऊ लागला. फळ्यावर काही लिहिलेले असायचे, ते वाचावे असे त्याला वाटे. तो लक्ष देऊन पाहू लागला. मुलांबरोबर वाचू लागला. त्याचा हुरूप आणखीन वाढला.

मुले पाटीवर लिहीत. त्यालाही लिहावेसे वाटे. मुलांच्या पेन्सिली पाटीवर वाजू लागल्या, की त्याच्या पायाची बोटे सळसळू लागायची. हाताच्या बोटांप्रमाणे त्यांची हालचाल व्हायची. बाळू आपल्या पायाच्या बोटांनी जमिनीवर रेघोट्या मारू लागला. उभ्या-आडव्या रेघा मारता मारता वर्तुळेही काढू लागला. मुले पाटीवर लिहितात तसे आपल्याला लिहिता आले पाहिजे, हा एकच ध्यास त्याला लागला.

एक दिवस त्याने पायाच्या बोटांत काडी धरली. पेन्सिलीने पाटीवर लिहितात तसे काडीने तो जमिनीवर अक्षरे काढण्याचा प्रयत्न करू लागला. हवी तशी काडी वळू लागली. त्याचा हुरूप वाढला. त्याची ही जिद्द, धडपड पाहून आजीने त्याला पाटी-पेन्सिल दिली, पुस्तकही दिले. त्याचा आनंद दुणावला. किती वाचू, किती लिहू असे त्याला होऊन गेले. एका पायाच्या बोटांत पुस्तक धरून दुसऱ्या पायाच्या बोटांनी तो पाने उलटू लागला आणि असे तो पुस्तक वाचू लागला. वर्गात विचारलेल्या प्रश्नांची तो भराभर उत्तरे देऊ लागला.

त्याने वाचनात प्रगती केली तशी लेखनातही केली. पायाच्या बोटांत पेन्सिल धरून तो पाटीवर लिहूलागला. काना, मात्रा, वेलांट्या जमू लागल्या. गाठीचा भ, गाठीचा ध ही अक्षरेसुद्धा लिहिता येऊ लागली. त्या अक्षरांतील गाठ छान काढता येऊ लागली. अक्षरांना हवा तो आकार देता येऊ लागला. आरंभीची बटबटीत मोठी अक्षरे जाऊन लहान, वळणदार अक्षरे लिहिता येऊ लागली. त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला.



त्याची आजीही आनंदून गेली. तिने मग त्याला कागद दिले, पेन्सिल दिली. बाळू पायानेच कागदावर लिहू लागला. चित्रेदेखील काढू लागला. असाच काही काळ लोटला आणि पायाच्या बोटांत ब्रश धरून तो चित्रेही रंगवू लागला.

हात नसलेल्या बाळूची जिद्द इथेच संपली नाही. शाळेच्या क्रीडांगणावर त्याचे मित्र खेळत. विविध खेळांच्या स्पर्धा होत.बाळूला वाटे, त्यांत आपणही भाग घ्यावा. त्याच्या मनात आले ते त्याने करून दाखवले. लंगडी, कबड्डी, खो-खो या मैदानी खेळांत भाग घेऊ लागला. त्याने चांगलाच सराव केला. एक दिवस आपल्या शाळेच्या संघातून तो मैदानात उतरला. छान खेळला. पाहणाऱ्यांच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही! हाताविना त्याचे काही अडले नाही. हातांची उणीव त्याने पायांनी भरून काढली आणि हळूहळू आपल्याला हात नाहीत हे तो विसरून गेला.

शेंदरी हे बाळूचे गाव. कोल्हापूर जिल्ह्यातल्या गडहिंग्लज तालुक्यातले. हात नव्हते म्हणून त्याला शाळेत घातले नव्हते. पण आपणहून शाळेत जाऊन एक-एक परीक्षा उत्तीर्ण होत तो आता महाविद्यालयातही गेला आहे.

जी किमया काहींना हातांनीही करता येत नाही; ती त्याने पायांनी करून दाखवली!

**शब्दार्थ:** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**ध्यास**– तीव्र इच्छा; सतत चिंतन. **पेर** – कांडे. **पारावार** – अंत; मर्यादा.
**किमया** – जादू. **आनंद गगनात न मावणे** – अतिशय आनंद होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. अपंग असूनही बाळू कोणकोणत्या गोष्टी करायला शिकला ?
२. बाळू लिहायला कसा शिकला ?
३. आपण बाळूपासून कोणता गुण घेतला पाहिजे ?
४.'सळसळ'हा एक आवाजदर्शक शब्द आहे. असे आवाज दाखवणारे आणखी काही शब्द सांगा.
५. ' गाव ' पासून ' गावकरी ' हा शब्द तयार झाला. त्याप्रमाणे शेत, काम, मान यांपासून तयार होणारे शब्द लिहा.

# १३. सोन्याची जांभळे

एका गावात रामराव नावाचा एक बागायतदार होता. तो खूप श्रीमंत होता. कोणत्याही गोष्टीची त्याला कमतरता नव्हती. कशाची ददात नव्हती.

असे असूनही तो सुखी नव्हता. स्वभावाने तो फार भित्रा होता. शकुन-अपशकुनावर त्याची श्रद्धा होती. पाल चुकचुकली किंवा टिटवी ओरडत गेली, की तो घाबरे. त्याला वाटे आता काहीतरी वाईट घडणार.

त्या गावातच नागू नावाचा एक भगत राहत होता. भगत म्हणजे मंत्रतंत्र, जादूटोणा करणारा. भित्र्या रामरावाचा स्वभाव त्याने ओळखला. त्याला चांगला लुबाडता येईल अशी त्याची मनोमन खात्री झाली. एक दिवस रामरावाकडे जाऊन तो म्हणाला," धनी, तुम्ही कसल्या ना कसल्या काळजीत दिसता. माझ्या मंत्रानं तुमची सगळी काळजी मी दूर करीन."

रामरावाला नागूचा आधार मिळाला. त्याला बरे वाटले. नागूला त्याने आपल्याकडे भगत म्हणून ठेवून घेतले.

पाल चुकचुकली, की नागू मंत्र म्हणून भंडारा फुंकी. घुबडाचा आवाज ऐकला, की लिंबू कापून घरावर फेकी. उंबऱ्यावर कोणी शिंकले, की लगेच दाराच्या चौकटीवर पाणी शिंपी. आपल्या मंत्राचा त्याने माराच सुरू केला. जिकडेतिकडे मंत्रच मंत्र! नागूने रामरावाला चांगलेच दिपवून टाकले.

एके दिवशी या रामरावांची म्हातारी आई आजारी पडली. ही एक संधीच चालून आली असे नागूला वाटले. त्याने मंत्रतंत्र सुरू केले.गंडेदोरे बांधले. अंगारे-धुपारे सुरू झाले. पण रामरावाची आई काही बरी होईना. मग एक मोठा यज्ञ करावा असे नागूने सुचवले. रामराव श्रीमंत होता. त्याने लगेच मोठा यज्ञ केला. खूप पैसा खर्च केला. या यज्ञात नागूने चांगलाच हात धुऊन घेतला. पण या यज्ञाचा काही उपयोग झाला नाही. रामरावाच्या आईचा आजार वाढला आणि बिचारी त्यातच गेली.

काही दिवस लोटले. नागू भगत रामरावाला म्हणाला, " धनी, आपल्या परीनं करायचं ते आपण केलं. पण त्यांचं आयुष्यच तेवढं होतं, त्याला आपण



तरी काय करणार ? एक गोष्ट मात्र करायची राहिली. ..."

रामरावाने विचारले, "ती कोणती ?"

नागू म्हणाला, "आपल्या हातून एक गोष्ट करायची राहून गेली. आईसाहेबांना जांभळं खाण्याची इच्छा होती; पण त्यांची ती इच्छा काही पूर्ण झाली नाही."

रामराव हळहळत म्हणाला, "अरे नागू, दिवसच जांभळाचे नव्हते. मग जांभळं आणायची कोठून ? कुठं मिळाली असती, तर मी एकाला दहा नोकर सोडले असते. कुठूनही जांभळं आणून दिली असती."

नागू म्हणाला, "धनी, हे सगळं खरं. पण त्यांची इच्छा यात अडकलीय. त्यांना स्वर्गात शांती नाही मिळणार."

"पण यावर काय करू सांग. उपाय सुचव."

धूर्त नागूने उपाय सुचवला, "धनी, चिंता करू नका. उपाय आहे. सोन्याची जांभळं करा आणि या भगताला दान करा. म्हणजे ती आईसाहेबांना पोचल्यासारखी होतील."

नागूने सांगितलेला उपाय रामरावाने लगेच अमलात आणला. गावच्या सोनाराला बोलावले. ' चांगली टोपलीभर सोन्याची जांभळं कर ' असे तो त्याला म्हणाला.

सोनार चतुर होता. त्याने नागूचा कावा ओळखला. भाबड्या रामरावाला यातून कसे वाचवावे हाच विचार तो करत राहिला.

सांगितल्याप्रमाणे सोन्याची जांभळे घेऊन सोनार आला. तो म्हणाला, "धनी, ही घ्या जांभळं. पण त्यांचा काही उपयोग नाही."

आश्चर्याने रामरावाने विचारले, "का रे बाबा, उपयोग का नाही ?"

सोनार म्हणाला, "काल रात्रीच आईसाहेब माझ्या स्वप्नात आल्या होत्या. त्या मला म्हणाल्या,'माझी कंबर फार दुखते. त्यावर आधी औषध पाठवा. मी अन्नपाणी सोडलंय. मला जांभळं नकोत.' आधी हा उपाय करा."

रामराव चिंतेत पडला. त्याला धीर देत सोनार म्हणाला, "काळजी करू नका. मी औषध तयार करतो. आज संध्याकाळी नागू भगताला घेऊन माझ्या घरी या."

संध्याकाळ झाली. नागूला घेऊन रामराव सोनाराकडे गेला. लाल-लाल तापवलेली सळी हातात घेऊन सोनार म्हणाला, "ह्या सळीनं भगताच्या कंबरेला मी चांगले डाग देणार आहे!"

हे ऐकताच थरथर कापत भगत म्हणाला, "बाप रे! डाग! आणि ते कशासाठी ?"



तापवलेली सळी घेऊन जवळ जात सोनार म्हणाला, "भगता, तुला सोन्याची जांभळं दिली, तर ती स्वर्गात आईसाहेबांना मिळतात ना? मग तुझ्या कंबरेला डाग दिले, तर आईसाहेबांची कंबरदुखी का थांबणार नाही?"

हा बाका प्रसंग ओळखून नागूने लगेच रामरावाचे पाय धरले. तो म्हणाला, "धनी, पैशाच्या लोभानं मी आजवर फसवलं, मला माफ करा. यापुढं मी कोणाच्या वाटेला जाणार नाही."

या प्रसंगाने रामरावाचे डोळे उघडले. खुळ्या समजुतीच्या मागे लागून आपण अकारण फसलो हे त्याच्या लक्षात आले.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**बागायतदार** – स्वतःच्या मालकीची बागायती शेती असलेला मोठा शेतकरी. **ददात** – उणीव; कमतरता. **शकुन** – शुभाशुभसूचक चिन्ह. **अपशकुन** – वाईट चिन्ह. **उंबरा** – उंबरठा – दाराच्या चौकटीचा लाकडी किंवा दगडी तळभाग. **दिपवून टाकणे** – आश्चर्यचकित करणे. **गंडेदोरे** – मंतरलेले दोरे. **हात धुऊन घेणे** – घेता येईल तेवढा फायदा करून घेणे. **स्वर्ग** – पुण्यकर्मे करणारांना मृत्यूनंतर सुखाने राहायला मिळते अशी समजूत असलेले एक काल्पनिक ठिकाण. **बाका** – कठीण. **वाटेला जाणे** – खोडी करणे. **डोळे उघडणे** – खरी गोष्ट कळून चुकीची कल्पना नाहीशी होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. रामरावांचा स्वभाव कसा होता ?
२. त्याचा फायदा कोणी घेतला ?
३. रामरावाला दिपवण्यासाठी नागूने कायकाय केले ?
४. रामरावाला फसवण्यासाठी नागूने कोणती युक्ती केली ?
५. नागूचा डाव त्याच्यावरच कोणी व कसा उलटवला ?
६. (अ) 'मंत्रतंत्र' यासारखे आणखी काही जोडशब्द लिहा.
(आ) 'पाल चुकचुकणे, टिटवी ओरडणे' अशा काही शकुन-अपशकुनाबद्दल चुकीच्या समजुती रूढ आहेत. त्यांवर आपण विश्वास ठेवू नये. अशा तुम्हांला माहीत असलेल्या आणखी काही चुकीच्या समजुती सांगा.
(इ) 'हात धुऊन घेणे', 'वाटेला जाणे', 'डोळे उघडणे' यांचा उपयोग करून आणखी काही वाक्ये तयार करा.




# १४. ते अमर हुतात्मे झाले

जे देशासाठी लढले,
ते अमर हुतात्मे झाले.

सोडिले सर्व घरदार,
सोडिला सुखी संसार,
ज्योतीसम जीवन जगले,
ते अमर हुतात्मे झाले.

तो तुरुंग, ते उपवास,
सोसला किती वनवास!
कुणि फासावरती चढले,
ते अमर हुतात्मे झाले.

झगडली, झुंजली जनता,
मग स्वतंत्र झाली 'माता',
हिमशिखरी ध्वज फडफडले,
ते अमर हुतात्मे झाले.

हा राष्ट्रध्वज साक्षीला,
करु आपण वंदन याला.
जयगीत गाउ या अपुले
ते अमर हुतात्मे झाले.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**हुतात्मा**— लोकहिताच्या थोर कार्यासाठी स्वतः चा प्राण अर्पण करणारा. **वनवास**— हालअपेष्टा. **हिमशिखर** — बर्फाच्छादित शिखर.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. देश स्वतंत्र करण्यासाठी जनतेने कोणकोणत्या गोष्टी केल्या ?
२. जे देशासाठी लढले त्यांचे जीवन ज्योतीसारखे होते असे का म्हटले आहे ?
३. कवीने 'माता' असे कोणाला म्हटले आहे ?
४. आपल्या राष्ट्रध्वजाचे चित्र वहीवर काढा व रंगवा.
५. 'जिंकू किंवा मरू' हे ग.दि. माडगूळकरांचे समरगीत पाठ करा.

## १५. प्रकाश, प्रकाश!

मद्रासच्या मुक्कामात माझ्यावर एक मोठा कठीण प्रसंग गुदरला होता. तो आठवला, की आजही माझं अंग भीतीनं शहारतं.

आभाळ काळवंडलं होतं. विजा चमकत होत्या. मधूनमधून ढगांचा गडगडाट होत होता. अशा या वातावरणात सर्कशीच्या पिंजऱ्यात मी वाघ-सिंहांचे खेळ घेत होतो.

कसरतीचं पहिलं काम मी संपवलं. दुसऱ्या कामासाठी पिंजऱ्यातील स्टूलं इकडून तिकडं हलवत होतो. एवढ्यात, काही ध्यानीमनी नसताना, अगदी अचानकपणे वीज गेली. तंबूतील एकूणएक दिवे मालवले गेले. सगळीकडं अंधार पसरला. काळोखच काळोख! मागं काळोख, पुढं काळोख, भोवताली काळोख. पाहावं तिकडं सगळीकडं काळामिट्ट अंधार. त्या काळोखात काहीच दिसत नव्हतं, काही सुचतही नव्हतं. मी जनावरांच्या पिंजऱ्यात मध्यभागी उभा होतो. माझ्यासमोर आणि आजूबाजूला वाघ, सिंह अशी जंगली जनावरं होती. त्यांतील काही फुरफुरू लागली. त्यांचा आवाज माझ्या कानांवर आला. मनात आलं, 'त्यांपैकी एखाद्यानं जरी उचलं खाल्ली तर!' हा विचार मनात येऊन गेला आणि माझ्या काळजाचं पाणी पाणी झालं. मी थरारलो. काय करावं हेच कळेनासं झालं.

हाताला आलं ते लाकडी स्टूल मी उचलून घेतलं. त्याचे पाय पुढं करून ते मी पोटाशी धरलं. तशा स्थितीत त्या अंधारात चाचपडत हळूहळू मी मागं जाऊ लागलो. पिंजऱ्याच्या कडेला माझी पाठ लागेपर्यंत मी मागं सरकलो. गजांना पाठ लावून हातातलं स्टूल मी समोर रोखून धरलं. एखाद्या जनावरानं हल्ला केला तर त्याची पहिली धडक स्टुलावर बसावी आणि त्यामुळं जीव बचावावा एवढाच माझा त्यात हेतू होता. निदान पूर्वसूचना मिळावी म्हणजे काही धडपड करता येईल असं वाटत होतं. हे संकट कसं टाळावं हा मला प्रश्न पडला. जनावरांना या पिंजऱ्यात ठेवून आपण बाहेर पडावं, तर ते धोक्याचं होतं. सिंहांनी पिंजऱ्यातल्या एकुलत्या एका वाघावर हल्ला चढवून धुमाकूळ

घातला असता. काय करावं ते कळत नव्हतं. अशा परिस्थितीत अंगातली सगळी शक्ती एकवटून त्या काळोखात मी मोठ्यानं ओरडलो, " प्रकाश, प्रकाश!"

माझा आवाज प्रेक्षकांच्या कानी गेला. प्रकाशासाठी मी मारलेल्या हाका त्यांनी ऐकल्या. सगळ्यांच्या मनांत एकच विचार येऊन गेला – प्रकाश, प्रकाश. उजेड, उजेड. माझ्या हाकेबरोबर एका प्रेक्षकानं चटकन आपल्या खिशातून आगपेटी काढली, काडी पेटवली आणि हात लांब करून मला उजेड देण्याचा त्यानं प्रयत्न केला.



बस्स! ही एक काडी दिसली आणि एका काडीपाठोपाठ असंख्य अगणित काड्या ओढल्या जाऊ लागल्या. शेकडो, हजारो प्रेक्षकांनी आपले हात खिशांत घातले आणि भराभर आगपेट्या काढून काड्या पेटवायला सुरुवात केली. एकाच वेळी पेटणाऱ्या शेकडो, हजारो काड्यांचा मिणमिणता प्रकाश तंबूभर पसरला.

ते दृश्य किती सुंदर होतं म्हणून सांगू! एकाच वेळी हजारो मिणमिणत्या ज्योती आपल्याभोवती तेवत आहेत, असं कधी तुम्ही पाहिलं आहे का? त्या काळ्याकुट्ट अंधारात जे दृश्य मी पाहिलं ते मोठं विलोभनीय होतं, विलक्षण होतं!

अजूनही ते दृश्य जसंच्या तसं माझ्या डोळ्यांसमोर आहे. मी ते कधीही विसरू शकणार नाही. त्यानंच तर मला जीवदान मिळालं. त्या हजारो मिणमिणत्या ज्योतींनी मला वाचवलं. एकाच वेळी ओढल्या जाणाऱ्या हजारो काड्यांकडं त्या जनावरांचं लक्ष गेलं आणि मी बचावलो.

एकाएकी गेलेली वीज थोड्याच वेळात पुन्हा आली. टाळ्यांचा गजर झाला. मध्ये फक्त चार-पाच मिनिटंच गेली असतील, तेवढ्यात केवढा कठीण प्रसंग गुदरला होता! वीज आल्यानं ते संकट आता टळलं. सर्कशीचा तंबू आणि खेळाचं रिंगण पुन्हा प्रकाशानं उजळून निघालं. प्रेक्षकांच्या चेहऱ्यांवर समाधान झळकलं. या सगळ्या प्रसंगाचं स्मरण होताच आजही मी थरारून जातो.

त्या अंधारात ज्यानं पहिली काडी ओढली त्यानं मला वाचवलं.त्याचा मी जन्माचा ऋणी आहे.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**गुदरणे** — ओढवणे; येऊन ठेपणे. **शहारणे** — अंगावर काटा येणे. **कसरत** — मर्दानी खेळ. **मालवणे** — विझवणे. **काळजाचे पाणी पाणी होणे** — भीतीने अतिशय घाबरून जाणे. **धुमाकूळ** — धिंगाणा. **विलोभनीय** — सुंदर. **तेवणे** — जळणे. **रिंगण** — वर्तूळ.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. पाठातील प्रसंग कोणत्या ठिकाणी घडला व त्या वेळी वातावरण कसे होते ?
२. वीज गेल्याने कोणते संकट उभे राहिले ?
३. या संकटापासून बचाव होण्यासाठी कोणती युक्ती केली गेली ?
४. (अ) खालील शब्दसमूहांचा उपयोग करून नवी वाक्ये तयार करा :
काळजाचे पाणी पाणी होणे; उतराई होणे; उचल खाणे.
(आ) 'सिंह' असा शब्द पाठात आला आहे. हा लिहिल्यासारखा न वाचता 'सिंव्ह' असा उच्चारायचा असतो. तसेच पुढील शब्दांचे उच्चार त्यांच्यापुढील कंसात दाखवल्याप्रमाणे करावे :
संरक्षण (संव्रक्षण), संशय (संव्शय), संसार (संव्सार), संहार (संव्हार).
(इ) अंधारच अंधार – म्हणजे खूप अंधार. पुढील शब्द या पद्धतीने वापरून वाक्ये बनवा :
पाणी, उजेड, माणसे, मुले, आंबे.

# १६. आईचे पत्र

नांद्रे, ता. पाचोरे,
जिल्हा: जळगाव.
दि. २२-१०-१९८५

चि. बाबू आणि सगुणा यांना,
अनेक आशीर्वाद.

चि. बाबूचं छान छान पत्र पोचलं. चि. सगुणानंही शेवटी दोन ओळी लिहिल्या, त्यामुळं आणखीनच गंमत वाटली.

आम्ही दिवाळीत तिकडं येणार म्हणून तुम्ही वाट पाहत असणार; पण इथं कामाची नुसती टिप्परघाई चालली आहे. सुगी चालू आहे ना ? सुगी सोडून तिकडं कसं येता येईल ?

तुम्ही आजोळी गेल्यापासून टिप्पू आणि मनी कसनुसे दिसतात. मनी तर सारखी पायांत घोटाळत असते आणि आपला टिप्पू तुम्ही दिसाल म्हणून सारखा आत-बाहेर करत असतो. तुम्ही दिसत नाही म्हणून खट्टूही होतो.



दिव्यापाशी बसून मी इथं पत्र लिहीत आहे खरी; पण तिकडचं सर्व चित्र डोळ्यांसमोर उभं राहतं. तुमच्या आजोळचं ते सारवलेलं आणि रांगोळी घातलेलं अंगण, तिथंच एका कोपऱ्यात तुम्ही तयार केलेला किल्ला, रंगीबेरंगी आकाशकंदील — हे सगळं मला इथूनच कसं स्पष्ट दिसतं. तुम्ही तिथं चांगलेच रमून गेला असाल. इकडची आठवण तरी होते ना ?

अरे, इकडं एक वाईट गोष्ट घडली. आपला तो पवारांचा संभा आहे ना, त्याच्या डोळ्याला इजा झाली. कोणीतरी पेटता फटाका फेकला आणि तो त्याच्या डोळ्याला लागला. बिचारा संभा! डोळा फार नाजूक अवयव आहे. त्याला जपावं लागतं; पण संभाचे आईवडील डॉक्टरकडं जायचं सोडून गावठी उपचार करत राहिले. त्यामुळं डोळा बरा तर झाला नाहीच; पण जखम चिघळतच चालली. नको त्या गोष्टींवर विश्वास ठेवून या देवाला नवस कर, त्या देवाला नवस कर, असं करत बसले आहेत. चांगलं सांगायला गेलं तर

ऐकतही नाहीत. काय करणार! बिचारा संभा किती केविलवाणा झालाय!

शाळा सुरू होण्याआधी परत या. केव्हा येणार ते पत्रानं कळवा. तीर्थरूप आजी व तीर्थस्वरूप मामा व मामी यांना नमस्कार सांगा. तुम्हांला व तुमच्या नव्या सोबत्यांना अनेक आशीर्वाद.

तुमची,

आई

**शब्दार्थ :** *************************************

**टिप्पर घाई** – फार घाई. **खट्टू होणे** – हिरमुसणे; नाराज होणे. **नवस बोलणे** – एखादी गोष्ट व्हावी म्हणून देवाला विनवणी करणे व ती झाली म्हणजे देवासाठी अमुक एक गोष्ट करीन अशी प्रतिज्ञा करणे. **केविलवाणा** – दीनवाणा; कीव आणणारा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. कशामुळे गंमत वाटली असे आईने पत्रात म्हटले आहे ?
२. मुले आजोळी गेल्यामुळे टिप्पू आणि मनी यांच्या वागण्यात कोणता बदल झाला ?
३. पत्र लिहीत असताना आजोळची कोणती चित्रे आईच्या डोळ्यांसमोर उभी राहतात ?
४. कोणती वाईट गोष्ट आईने मुलांना कळवली आहे ?
५. डोळ्याची इजा बरी होण्यासाठी संभाच्या आईवडलांनी कोणत्या गोष्टी केल्या? खरे तर त्यांनी काय करायला हवे होते ?
६. पत्राच्या आरंभी तारीख दिलेली आहे. तारखेपूर्वी 'दि.' असे लिहिले आहे. 'दि.' म्हणजे दिनांक. तसेच 'चि.' म्हणजे चिरंजीव. पत्राच्या शेवटी तीर्थरूप, तीर्थस्वरूप असे शब्द आहेत. त्या शब्दांऐवजी कोणती अक्षरे येतील ? शब्दांची अशी काही रूपे माहीत करून घ्या.
७. जोड्या लावा :

| | |
|---|---|
| डोळा | रांगोळी |
| अंगण | नाजूक |
| नवस | इलाज |
| डॉक्टर | देव |

८. असेच पत्र तुम्हांला आले आहे असे समजून तुमच्या डोळ्यांपुढे कोणती चित्रे उभी राहतात, ती थोडक्यात लिहून काढा.

# १७. वासुदेव

टिल्लम् टिल्लम्
ताल वाजतो.
मुखी हरीचे
नाम गर्जतो.

टिल्लम् टिल्लम्
प्रभातकाली
थय् थय् नाचत
स्वारी आली.

शिरि शंकुपरि
मोर पिसांचा
टोप घातला
सुंदर साचा.

कवड्या गुंफुनि
केला कशिदा
अंगरख्यावरि
मोहक साधा.

ऐटदार बघ
पाउल पडते,
घुंगुर पायी
मधुर बोलते.

सर सर, सर सर,
गर गर फिरती,
भर भर फिरता
छन् छन् करती.

टिल्लम् टिल्लम्
नाद करोनी
वासुदेव हा
उभा अंगणी.



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**शंकू** — तळाला गोल व वरती निमुळती होत जाणारी आकृती. **साचा** — खरा. **कशिदा** — भरतकाम; वस्त्रावर सुताने अगर रेशमाने केलेले नक्षीकाम.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. वासुदेव आला आहे, हे आपल्याला कोणत्या आवाजावरून समजते ?
२. वासुदेवाच्या पोशाखाचे वर्णन करा.
३. गरगर फिरताना 'छनछन' असा आवाज कशाचा होतो ?
४. 'गट्' या शब्दाला 'दार' ही अक्षरे पुढे जोडल्याने 'गट्दार' हा शब्द बनला. असे आणखी काही शब्द सांगा.
५. 'छनछन' या आवाजाने घुंगरांचा बोध होतो. तसेच खालील आवाजांवरून कोणत्या वस्तू डोळ्यासमोर येतात ?
(अ) घण्घण् (आ) किण्किण् (इ) फट्फट् (ई) टिक्टिक् (उ) कड्कड्.

# १८. निशाण फडकले

मामाच्या खांद्यावर जाळे. त्याच्या एका हातात कंदील. दुसऱ्या हातात रामचा हात. राम मामाबरोबर घराबाहेर पडला. कोणीतरी विचारले, "काय राम, मामाबरोबर समुद्रावर निघाला आहेस, पाग धरणार काय ? मोठमोठ्या लाटा पाहून भीती तर वाटणार नाही ना ?" यावर मामाच म्हणाला, " तसा तो धीट आहे. देवमासे, हुसेनी असे मोठमोठे मासे पाहून तो घाबरायचा नाही."

रात्र होती. टिपूर चांदणे पडलेले. झाडांच्या पानांवर चांदणे. खाली बुंध्याशी सावलीचे काळे वर्तुळ. हालणारे, डोलणारे. वाऱ्याने पाने हालली, की शीतल प्रकाश आणि काळोख यांची लपाछपी चाले. ते दोघे किनाऱ्यावर आले. रुपेरी वाळू. चमचम चमकणारी. सगळीकडे कसा चमचमाट दिसत होता. पाणीही लकाकणारे. हेलावणाऱ्या लाटा. किनाऱ्याकडे धावणाऱ्या. नाचणाऱ्या, खळाळणाऱ्या. पाठशिवणीचा खेळ खेळणाऱ्या. पाण्यावर होड्या हिंदकळ-णाऱ्या. काही दर्याकडे सरसर जाणाऱ्या.



रामचे मन आनंदले. मामाबरोबर तो पाण्यात शिरला. बघावे तिकडे लकाकणारे पाणी. ते रुपेरी, चांदण्याचे पाणी उडवावेसे त्याला वाटले. मामाने जाळे होडीत ठेवले. कंदील ठेवला. मग उडी मारून तो वर गेला. रामलाही उचलून आत होडीत घेतले. एकाने नांगर उचलला. होडी चालू लागली. पाणी कापत जाऊ लागली. एकमेकांना हाका देत होड्या दर्याकडे निघाल्या. कोणी गाणे म्हणू लागले – वल्हव रे नाखवा....

थोड्या वेळाने दांडी आली. मागे, खाली, पुढे दर्या. सगळीकडे लाटाच लाटा. उफाळणाऱ्या, होड्यांना मागे रेटणाऱ्या. लाटा आल्या, की होड्या मागे सरकत आणि वल्ही मारून त्या पुन्हा पुढे होत. लाटा पुन्हा त्यांना मागे लोटत. होड्या पुन्हा पुढे जात. रामला वाटले या होड्या आणि दर्या हुतुतू खेळतात. दर्या त्यांना आत येऊ देत नव्हता. होड्या काही करून आत जाऊ बघत होत्या. रामला हा लाटांचा खेळ मजेदार वाटला.

होडी दूर दूर गेली. जिकडे-तिकडे पाणीच पाणी दिसू लागले. रामने लांबवर पाहिले. आकाश पाण्याला टेकलेले दिसले. चांदण्या लुकलुकत होत्या. त्याला वाटले त्या तोडून घेता आल्या तर किती मज्जा येईल! मुठी भरभरून घेता येतील.

होडी थांबली. रामचा मामा आणि त्याचे साथीदार जाळे टाकू लागले. होडी पुन्हा सुरू झाली. जाळे टाकत निघाली. अबब! केवढं मोठं जाळं! लांबच लांब, खूप लांब.

रामला केव्हा झोप लागली कळले नाही. मामाने उठवले तेव्हा त्याला खूप मासे दिसले. होडी माशांनी भरून गेली होती. सारे खुशीत होते. मामाने त्याला चहा दिला. स्टोव्ह पेटवून होडीतच चहा केला होता. चहा पिऊन त्याचे मन तरतरीत झाले. एवढ्यात वाऱ्याचा एक जोराचा लोट आला. तो धडपडला, हातातला पेला खाली पडला. मामा म्हणाला, "अरे संभाळ. असा जोराचा वारा आला, की मोठमोठ्या लाटा येतात."

मामा असे सांगत असतानाच वारा जोराने वाहू लागला. घों-घों असा आवाज येऊ लागला. लाटा उसळू लागल्या आणि हाकारा ऐकू आला— 'पळा पळा,खाडीत शिरा,' असा इशारा देत एक मचवा वेगाने येत होता. पाठोपाठ दुसरा मचवा आला. त्यातून कोणीतरी ओरडले, "हुसेनी रे हुसेनी, पळा, पळा."

मामाने पाहिले. एक भला मोठा हुसेनी जबडा वासून होडीवर चालून येत होता. त्याच्या फुंकरीने लाटा उफाळत होत्या. खवळलेला समुद्र गर्जत होता.



उसळलेल्या लाटांचे पाणी अंगावर येत होते. त्या माऱ्याने सगळे चिंब भिजले. हुसेनी जोरदार हल्ले चढवत होता. त्याचे हल्ले चुकवत मामाने होडी कशीबशी दांडीजवळ आणली. दांडी ओलांडली. हुसेनी मागे फिरला. सर्वांना हायसे वाटले. संकट टळले म्हणून त्यांनी होडीवर निशाण फडकवले.



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**पाग** – मासे धरण्याचे मोठे जाळे. **हुसेनी** – समुद्रातील एक विशिष्ट मोठा काळा मासा. **नांगर** – गलबत स्थिर राहण्यासाठी पाण्यात सोडायचा मोठा वजनदार आकडा. **दांडी** – समुद्रात लांबवर गेलेला जमिनीचा चिंचोळा भाग. **खाडी** – भरतीचे पाणी जेथवर घुसते तो समुद्राचा भाग. **हाकारा** – आरडाओरडा; मोठ्याने मारलेल्या हाका. **मचवा** – होडी. **हायसे वाटणे.** - संकटातून सुटल्याबद्दल आनंद होणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. मामाबरोबर राम कोठे व कशासाठी चालला होता ?
२. किनाऱ्यावर आल्यावर रामला कोणते दृश्य दिसले ?
३. होड्या व लाटा यांची रेटारेटी पाहून रामच्या मनात कोणती कल्पना आली ?
४. लुकलुकणाऱ्या चांदण्या पाहून त्याला काय करावेसे वाटले ?
५. 'पळा पळा, खाडीत शिरा.' असा इशारा कोणी व का दिला ?
६. (अ) 'चमकणे' या शब्दावरून 'चमचमाट' असा शब्द झाला आहे.
पुढील शब्दांपासून असे नवे शब्द तयार करा :
थयथय, कडकड, घमघम, गडगड, तडफड.
(आ) 'होड्या व लाटा हुतुतू खेळतात' ही या पाठातील एक सुंदर कल्पना आहे. अशा आणखी सुंदर कल्पना या पाठातून शोधा.

# १९. सेनापती बापट

काही माणसं आपल्याला नेहमी आठवतात. सेनापती बापट हे त्यांपैकी एक.

मी त्यांना प्रथम पाहिलं १९३० मध्ये. तेव्हा आपल्या देशावर इंग्रजांचं राज्य होतं. आम्हां तरुण मंडळींना आपला देश स्वतंत्र व्हावा असं वाटे. स्वातंत्र्य मिळवण्यासाठी आपण इंग्रजांबरोबर लढत होतो. या लढ्यातील एक प्रमुख सेनापती म्हणजे पांडुरंग महादेव बापट. मुळशीच्या सत्याग्रहात ते आघाडीवर होते. म्हणून लोक त्यांना 'सेनापती' म्हणत. आम्ही सर्व त्यांना 'तात्या' म्हणत असू.



त्यांचा वेश किती साधा ! आखूड विजार, अंगात कोपरी, डोक्याला पांढरी टोपी असा त्यांचा वेश. या वेशात ते एखादया कैद्यासारखे दिसत. कोणी त्यांना विचारतही, 'तात्या, तुम्ही हा कैद्यासारखा पोशाख का करता ?'

तात्या सांगत, 'अरे, आपला देश आहे इंग्रजांच्या ताब्यात. तेव्हा एका दृष्टीने आपण एका मोठ्या तुरुंगातच आहोत. म्हणजे कैदी आहोत आणि ही आठवण सतत मनात राहावी म्हणून मी हा असा पोशाख मुद्दाम करतो.'

तात्यांची देशभक्ती ही अशी विलक्षण होती. इंग्रजांची सत्ता झुगारून द्यावी आणि देश स्वतंत्र व्हावा, ही त्यांना तळमळ होती.

१९०२ सालची गोष्ट. तात्या पुण्याला महाविद्यालयात शिकत होते. ते फार हुशार होते. त्यांना अनेक भाषा येत. संस्कृत विषयात मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांनी मोठं बक्षीस मिळवलं, पण अभ्यासापेक्षाही त्यांचं देशावरच खरं प्रेम होतं. कॉलेजात असतानाच त्यांनी शपथ घेतली – 'मी या देशाच्या स्वातंत्र्यासाठी झटेन. देशाची आयुष्यभर सेवा करीन.'

घेतलेली शपथ तात्यांनी कधी मोडली नाही. ती खरी करूनच दाखवली. देशासाठी अनेक वेळा त्यांनी तुरुंगवास सोसला. स्वातंत्र्याच्या प्रत्येक लढ्यात भाग घेतला.

एक गोष्ट त्यांच्या मनास सतत सतावत असे. ती म्हणजे गावात सगळीकडं दिसणारी अस्वच्छता, गलिच्छपणा. बघावं तिकडं दिसणारा कचरा, घाण पाहून त्यांना राहवलं नाही. हातांत घमेलं आणि खराटा घेऊन ते सफाईकामाला लागले. ते लोकांना सांगत, 'अरे, आपल्या घरात आणि घराबाहेर किती कचरा, किती घाण ! त्यामुळं रोगराई वाढते. आपल्या गावात घाण नको. स्वच्छता पाळली की रोग पळतात. मन प्रसन्न राहतं. आपल्याला हात दिले आहेत ते कामासाठी. चला, लागा कामाला.'

आणखी एक गोष्ट तात्यांच्या मनाला डाचत असे आणि ती म्हणजे सगळीकडं दिसणारा भेदभाव. त्यामुळं होणारं नुकसान त्यांना पाहवत नसे. तात्या म्हणत, 'अरे, आपण सगळी भारतमातेची लेकरं ना ? मग हा ब्राम्हण, हा मराठा, हा मुसलमान, हा ख्रिश्चन असा भेद का करता ? या कलहाचा फायदा परके घेतात. आपसांत भांडू नका. एक व्हा. आपण एक झालो तर स्वतंत्र होऊ. भारतमातेचं दैन्य दूर करू. हातांत हात घाला. एकजुटीनं रहा.'

तात्यांचा स्वभाव फार करारी. जे मनाला पटेल ते न भिता करत. मला तो दिवस अजून आठवतो. सकाळी मी आरशासमोर उभा राहून दाढी करत होतो. इतक्यात खालून हाक ऐकू आली, "नारायणराव, आहात का घरात ? मी 'तात्या' आलोय."

मी म्हटलं, "या या." एवढ्यात झरझर जिना चढून तात्या वर आले. मी विचारलं, "तात्या, एवढ्या सकाळी काय काम काढलंत ?"

हातातला सोटा खालच्या फरशीवर वाजवत ते म्हणाले, "अरे, गोवा स्वतंत्र व्हावा म्हणून सत्याग्रह करणार आहात ना ? त्यात माझं नाव दाखल कर."

थक्क होऊन मी बघतच राहिलो. त्यांच्या सुरकुतल्या चेहऱ्याकडं बघून मी म्हणालो, "तात्या, या वयात तुम्ही सत्याग्रहात भाग घेणार ?"



तात्या हसत बोलले, "हे बघ, मी काही म्हातारा नाही. असेन फार तर पंचाहत्तर वर्षांचा. अंथरुणावर पडून केव्हातरी मरायचंय ना ? त्यापेक्षा गोव्याच्या सत्याग्रहात भाग घेऊन मरण आलं तर काय वाईट ?"

मी पाहतच राहिलो. पंचाहत्तर वर्षांचे तात्या किती तरुण दिसत होते!

या वयात त्यांनी सत्याग्रहात भाग घेऊ नये म्हणून आम्ही त्यांना पुष्कळ सांगून पाहिलं; पण कोणाचंही न ऐकता ते आमच्या तुकडीत दाखल झाले. पाउणशे वर्षांचे सेनापती तुकडीच्या आघाडीवर चालले होते.

तन-मन-धन देशासाठी अर्पण करणाऱ्या या सेनापतीला कोण विसरू शकेल ?

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**सत्याग्रह** – अन्यायाविरुद्ध सत्यासाठी अहिंसक मार्गाने झगडणे. **झुगारून देणे** – फेकून देणे. **सतावणे** – त्रास देणे. **डाचणे** – टोचणे; खुपणे. **कलह** – भांडण. **दैन्य** – वाईट अवस्था. **दाखल होणे** – येऊन मिळणे; सामील होणे. **अर्पण करणे** – वाहणे; दान करणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. तात्यांना सेनापती का म्हणत ?

२. तात्यांचा वेश कसा होता ? ते तसा वेश का करत असत ?

३. 'एका दृष्टीनं आपण सगळे एका मोठ्या तुरुंगात आहोत,' असं तात्या का म्हणत ?

४. तात्यांच्या मनाला कोणत्या गोष्टी डाचत होत्या ?

५. ' पंचाहत्तर वर्षांचे तात्या किती तरुण दिसत होते! ' असे का म्हटले आहे ?

६. (अ) 'सेनापती' यासारखे शेवटी 'पती' हा शब्द असलेले आणखी काही शब्द सांगा.
उदा. उद्योगपती.

(आ) 'सेनापती' म्हटले, की 'बापट' हेच नाव डोळ्यांपुढे येते. तसे खालील शब्दांवरून कोणाची आठवण येते ते लिहा :
लोकमान्य, कर्मवीर, लोकनायक, महात्मा, महर्षी, राजर्षी.

(इ) 'घमेले, खराटा, झाडू, केरकचरा, सफाई' हे एका विशिष्ट गटातले शब्द आहेत. पुढे दिलेल्या गटांतील असे शब्द सांगा :
स्वयंपाक, लेखन, समुद्र, पतंग.

# २०. कळी

एकदा एक कळी खूप खूप रुसली,
पानांचा घुंगट ओढून बसली.



धुक्याने आणले दवांचे मोती,
गुंफून ठेवले पानांच्याभोवती.
आंजारून पाहिले, गोंजारून पाहिले,
कळीच्या ओठांवर हसू नाही फुलले.



सूर्याने धाडले किरणांचे दूत,
चमचमणारा घेऊन मुकुट.
आळवून पाहिले, विनवून पाहिले,
कळीच्या मुखावर भाव नाही फुलले.



गरगर घेतली वाऱ्याने गिरकी,
कळीच्या गालावर मारली टिचकी.
वाऱ्याने घातली गाण्याची भूल,
कळीचे एकदम झाले फूल.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *
**घुंगट** – चेहरा दिसू नये म्हणून तोंडावर घेतलेले वस्त्र. **दूत** – निरोप पोचवणारा; त्रासुद; **भूल** – भुरळ; मोहिनी. **मुकुट** – किरीट; टोप.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. कळीचा रुसवा काढण्याचा प्रयत्न कुणीकुणी केला ? शेवटी त्यात यश कोणाला आले ?
२. कळीला हसवण्यासाठी धुक्याने कोणते प्रयत्न केले ?
३. चमचमणारा मुकुट घेऊन कळीकडे कोण आले होते ? कोणाकडून ?
४. त्याची विनवणी कळीने मान्य केली नाही, हा अर्थ कवितेतील कोणत्या ओळीत आहे ?
५. 'चमचमणारा' हा शब्द 'चमचमणे' यापासून झाला आहे. खालील शब्द कोणकोणत्या शब्दांवरून झाले आहेत ते ओळखा :
लकाकणारा, चकाकणारा, तळपणारा, घमघमणारा.

# २१. मोठे मन

एके दिवशी एका गावात एक साधू आला. गावाबाहेरच्या धर्मशाळेत तो उतरला. धर्मशाळेची बरीच पडझड झाली होती. एकच खोली कशीबशी तग धरून उभी होती. तीदेखील फार अरुंद व छोटी होती. साधूने ती खोली साफसूफ केली. आपली पथारी पसरली. खूप थंडी होती म्हणून खोलीचे दारही बंद करून घेतले. तो आडवा झाला. जेमतेम एका व्यक्तीला झोपता येईल एवढीच जागा होती.

रात्र झाली, तसा थंडीचा कडाका वाढला. अंगावर पांघरूण घेऊन तो पडून राहिला. इतक्यात दारावर टकटक झाली. दाराच्या फटीतून साधूने पाहिले. बाहेर कुणीतरी कुडकुडत दारात उभा असलेला त्याला दिसला. दार उघडून साधू त्याला म्हणाला, "अरे, आत ये ना. बाहेर थंडीवाऱ्यात कशाला उभा राहतोस ? ये, आत ये."

तो एक वाटसरू होता. रात्र झाली म्हणून निवाऱ्यासाठी तो येथे आला होता. त्याने आत डोकावून पाहिले. जेमतेम एका व्यक्तीला झोपता येईल अशी ती लहान जागा बघून तो थोडा संकोचून म्हणाला, "खोली फारच लहान दिसते. या एवढ्याशा जागेत आपण दोघे कसे मावणार ? त्यापेक्षा मी बसतो इथं बाहेरच – या भिंतीचा आसरा घेऊन."

साधू बोलला, "भल्या माणसा, तू असा बाहेर थंडीत कुडकुडत बसणार आणि मी खुशाल झोपू ? ते काही नाही. तू आत ये कसा. आपण दोघेही आत बसू. दोघांना बसण्याएवढी जागा इथं नक्कीच आहे."

असे म्हणून साधूने त्या वाटसरूला बळेच आत घेतले. ते दोघे कसेबसे त्या खोलीत बसले. थंडी होतीच, त्यात भर म्हणून वारेही वाहू लागले. साधूने दार बंद केले.

थोडा वेळ गेला आणि पुन्हा बाहेर कसलीतरी हालचाल झाली. दाराच्या फटीतून साधूने पाहिले. भिंतीचा आसरा घेऊन कोणीतरी बाहेर उभा आहे असे त्याला दिसले. थंडीमुळे तो थरथर कापत होता. त्याची ती अवस्था बघून दार उघडत साधू म्हणाला, "कोण रे बाबा तू ?"

थंडीने काकडत तो म्हणाला, "मी आहे एक यात्रेकरू."

साधू बोलला, "अरे, मग असा बाहेर का ? आत ये ना."



यात्रेकरूने पाहिले. ते दोघे कसेबसे दाटीवाटीने बसलेले त्याला दिसले. तिसऱ्याला बसता येईल एवढी जागा तेथे नव्हती. तो म्हणाला," तुम्ही बसा. मी आत येऊन तुम्हांला अडचण कशाला करू ?"

साधू म्हणाला, "दोघांनी आत बसायचं आणि तिसऱ्यानं बाहेर असं कुडकुडायचं? त्यापेक्षा आपण असं करू— आपण तिघंही दाटीवाटीनं उभं राहू. ये, तू आत ये. "

फारच आग्रह केला, तेव्हा तो यात्रेकरू खोलीत आला. ते तिघे दाटीवाटीने खोलीत उभे राहिले. त्या यात्रेकरूला हे बरे वाटले नाही. न राहवून तो पुन्हा म्हणाला," साधूमहाराज, माझ्यामुळं तुम्हांला अडचण झाली. तिघांनी असं अवघडून आत उभं राहण्यापेक्षा तुम्ही आरामात बसा. मी बाहेर जातो."

साधू काही ऐकेना. तो म्हणाला," ते काही नाही. आपण तिघंही दाटीवाटीनं उभं राहू." असे म्हणून साधू हसला आणि पुन्हा म्हणाला," ही थंडी कायम थोडीच राहणार आहे? ती आली आहे आपली मनं केवढी आहेत ते पाहायला. मन मोठं असलं की लहान घरही मोठं होतं. काय, खरं ना ?"

असे म्हणून साधूने दार लोटले आणि ते तिघेही आत उभे राहिले. एकमेकाला खेटून उभे राहिल्याने थोड्या वेळातच त्या खोलीत ऊब निर्माण झाली आणि थंडी पळून गेली.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**तग धरणे** – टिकून राहणे. **थंडीचा कडाका** – खूप थंडी. **भला** – चांगला. **यात्रेकरू** – तीर्थक्षेत्रांस जाणारा. **संकोच** – मनाला अवघडल्यासारखे वाटणे; भीड. **खेटून उभे राहणे** – अगदी चिटकून उभे राहणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. जागा अपुरी असूनदेखील साधूने वाटसरूला खोलीत का घेतले ?
२. यात्रेकरू खोलीत यायला का तयार नव्हता ?
३. साधू यात्रेकरूला अखेर काय म्हणाला ?
४. 'मन मोठं असलं की लहान घरही मोठं होतं' या धर्तीची आणखी काही वाक्ये तयार करा. त्या वाक्यांचा आरंभ 'मन मोठं असलं की...' असा करा.

# २२. चतुर बीरबल : भाग पहिला

(स्थळ : सम्राट अकबराचा दरबार. वझीर, नवरत्नांपैकी आठ रत्ने, सरदार, मानकरी हे सारे आपापल्या जागी बसले आहेत. भालदार-चोपदार, सेवक हे उभे आहेत. पडद्यात तुताऱ्या वाजू लागतात. त्यांच्या निनादात पडदा वर जातो. दरबाराचे दृश्य दिसू लागते. भालदार-चोपदार जयजयकार करतात – 'राजाधिराज, सम्राट अकबर बादशहाचा विजय असो ! )

सेवक : (ललकारी देत) हुश्शार ! निगा रख्खो ! राजाधिराज, सम्राट अकबर बादशहा येत आहेत.

(जयजयकार होतो. दरबारातील सर्व लोक उठून उभे राहतात. संथ पावले टाकत येऊन अकबर मोठ्या दिमाखाने सिंहासनावर आरूढ होतो.)

भालदार-चोपदार : (ललकारी देत) सम्राट अकबर बादशहांचा विजय असो !

(अकबर सभोवार नजर टाकून प्रश्न करतो.)

अकबर : बीरबल दरबारात दिसत नाहीत ?

वझीर : सरकार, माफी असावी. त्यांची तब्येत ठीक नाही असं कळतं.

अकबर : अरे, दरबारात बीरबल नसतील तर तो दरबार कसला ? बीरबलांशिवाय दरबाराला शान नाही.

वझीर: माफ करा सरकार, बीरबलांशिवाय कितीतरी चतुर आणि विद्‌वान लोक या दरबारात आहेत.

अकबर : वझीर, आमच्या बीरबलांची जागा भरून काढतील असे कोणकोण आहेत ? नावं तरी सांगा त्यांची.

वझीर : खाविंद, राजा मानसिंग, राजा तोडरमल, मशहूर गायक तानसेन, अब्दुल रहीम, विनोदमूर्ती मुल्ला दो प्याजा–अशी किती नावं सांगू ?

अकबर : बस्स, बस्स, बस्स ! अहो, ही मंडळी तर गुणी आहेतच; तरीही अखेर बीरबल ते बीरबलच. त्यांच्या चातुर्याची आणि पांडित्याची सर कुणालाच येणार नाही. त्यांच्यासारखे हजरजबाबी तेच ! कोणी काहीही प्रश्न विचारा. उत्तर तयार. आम्ही खूश आहोत त्यांच्यावर.



वझीर : (अदबीने) पण...सरकार...

अकबर : पण काय ? असं अडखळता का ? बोला.

वझीर : सरकार, माणसानं नम्र असावं.

अकबर : याचा अर्थ काय ? हे असं मोघम बोलू नका. वझीर, जे मनात असेल ते स्पष्ट बोला. काय म्हणायचंय तुम्हांला ?

वझीर : खाविंद, माफी असावी. बीरबल हे आपल्या खास मर्जीतले आणि विश्वासू आहेत... पण म्हणून...



अकबर : असे अडखळता का ? थांबलात का ? बोला.

वझीर : सरकार, बीरबल चतुर असतील, मोठे पंडितही असतील; पण त्यांनी ज्याचा-त्याचा पाणउतारा करावा ही गोष्ट योग्य नाही.

अकबर : (चमकून वळून पाहत) कोणाचा पाणउतारा केला ?

वझीर : (चाचरत) भर दरबारात त्यांचं नाव घेणं योग्य नाही आणि ते मला बरंही दिसणार नाही.

अकबर : माझी आज्ञा आहे.

वझीर : जी सरकार ! आता आपण आज्ञाच केली म्हणून बोलणं भाग आहे. (अडखळत) मी जे सांगेन ते आपल्या मनाला लागण्यासारखं आहे; पण आपण मनाला लावून घेऊ नये. काय सांगावं सरकार, आपल्या मेहुण्यांना त्यांनी परवा मूर्खात काढलं....

अकबर : (एकदम ताडकन) माझ्या मेहुण्यांना ? इथपर्यंत हद्द गेली त्यांची ?

वझीर : जी सरकार. याला पुरावा हवा असेल, तर आपण खुद्द बेगम-साहेबांनाच विचारावं.

अकबर : (कपाळावर आठ्या घालून, रोखून बघत) बीरबलांची ही हिम्मत!

वझीर : होय सरकार.

एक सरदार : (उठून मुजरा करत) आणि म्हणून एक अर्ज आहे सरकार...

अकबर : बोला. काय अर्ज आहे ?

एक सरदार : अलीकडं बीरबल भलतेच शेफारलेत.

दुसरा सरदार : (त्याला पुष्टी देत) होय सरकार, ते फारच शेफारलेत. दरबारातील नवरत्नांमधून त्यांना कमी करावं, म्हणजे ते ताळ्यावर येतील.

अकबर: त्यांना कमी करावं असं म्हणण्याइतकं काय केलं आहे त्यांनी ?

एक सरदार: आज तब्येतीचा बहाणा करून बीरबल दरबारात हजर नाहीत.

अकबर : त्यांनी बहाणा केला याला पुरावा काय ?

एक सरदार : तब्येत बरी नसल्याचा निरोप दिला आहे त्यांनी; पण मी तर त्यांना बाजारात फिरताना पाहिलं.

दुसरा सरदार : होय सरकार, ही गोष्ट खरी आहे. मी तर त्यांना देवळात जाताना पाहिलं.

तिसरा सरदार : सरकार, मी त्यांना म्हणालोही – तिकडं दरबार चालू असताना तुम्ही इकडं देवळात अभिषेक कसला घालत बसला आहात ? तर सरकार, यावर ते बोलले...(मान हलवून स्वत:चे दोन्ही कान धरत) छे छे! नकोच, कोणत्या तोंडानं मी ते बोलू ? मला सांगवत नाही सरकार...

अकबर : मग तर बोलाच. माझा हुकूम आहे.

सरदार: आपला हुकूम शिरसावंद्य मानलाच पाहिजे. नाहीतर मी बोललोच नसतो सरकार. खरं म्हणजे आम्ही ते सांगू नये आणि आपण ते ऐकू नये.

अकबर : जे असेल ते लवकर सांगा. मला कळलंच पाहिजे.

तिसरा सरदार : सरकार, बीरबल म्हणाले – देवापेक्षा काही दरबार मोठा नाही.

अकबर : असं म्हणाले ते!

तिसरा सरदार : महाराज, आपल्याजवळ खोटं बोलून आम्हांला काय मिळणार ?

अकबर : छे, छे! मला नाही वाटत हे खरं असेल म्हणून.

दुसरा सरदार : असेल नाही सरकार, हे खरंच आहे.

तिसरा सरदार : सरकार, दरबारात बीरबल हजर नाहीत याचा मग दुसरा अर्थ काय ?

अकबर : अस्सं! ह्याचा अर्थ... ह्याचा अर्थ कळतो आम्हांला. वझीर, आजपासून आपल्या दरबारातील नवरत्नांमधून काढून टाका त्यांना.



वझीर : खाविंद, ही शिक्षा फार होते असं वाटतं. याचा आपण फेरविचार केलात तर...

अकबर : फेरविचार मुळीच होणार नाही. ही शिक्षा फार होते ? वझीर, त्यांच्यावर आम्ही प्रेमही तेवढंच केलं होतं. शिक्षाही मोठीच असणार. याउपर बोलणे नाही. हुकमाची तामिली करा.

पहिला सरदार : पण सरकार.... बीरबल नाही तर दरबाराला शान नाही.

अकबर : हे आमचंच वाक्य तुम्ही आमच्या तोंडावर फेकता ? कट्ट आठवण आम्हांला करून देऊ नका. बीरबलापेक्षाही चतुर पंडित अनेक मिळू शकतील या जगात. शेरास सव्वाशेर असतोच.

पहिला सरदार : सरकार, मला वाटतं... आपण आपल्या मेहुण्यांना ही संधी द्यावी.

दुसरा सरदार : खाविंद, मलाही तसंच वाटतं.

तिसरा सरदार : अगदी माझ्या मनातली बात बोलून दाखवली. सरकार, ही सरदार मंडळी सुचवतात त्याचा विचार व्हावा. आपल्या मेहुण्यांना संधी द्यावी, म्हणजे बेगमसाहेबांही खूश होतील.

अकबर : (शांतपणे पाहत) निकोप राज्यकारभारासाठी आपण मला सल्ला द्यायचा, का कोण खूश होईल याचा विचार करून मला सल्ला द्यायचा? आपल्या असल्या सल्ल्याची मला आवश्यकता नाही. (तिघेही सरदार ओशाळतात.) ते काही नाही. आम्हांला बीरबलापेक्षा चतुर पंडित हवा. वझीर, आजच्या आज राज्यात दवंडी द्या. दरबारातील नवरत्नांमध्ये एक चतुर पंडित नेमायचा आहे. त्याची परीक्षा आम्ही स्वतः घेऊ, असं जाहीर करा.

(असे म्हणून अकबर बादशहा झटकन उठतो. दरबारातील सगळे मानकरी 'राजाधिराज, सम्राट अकबर बादशहाचा विजय असो' असा जयजयकार करतात. अकबर निघून गेल्यावर दरबार बरखास्त होतो आणि त्या रिकाम्या रंगमंचावर ढोलके वाजवत एक शिपाई प्रवेश करतो.)

शिपाई : (ढोलके वाजवत दवंडी देत) ऐका हो ऐका, सम्राट अकबर बादशहांचा

हुकूम आहे, की बीरबलांना दरबारच्या नवरत्नांमधून कमी करण्यात आलं असून त्या जागी नवा चतुर पंडित नेमायचा आहे. ज्यांना या पदासाठी आपण लायक, योग्य, पात्र आहोत असं वाटतं,त्या सर्वांनी उद्या सकाळी दरबारात हजर राहावं हो ऽऽऽ

(अशी दवंडी देऊन एका विंगेतून आलेला हा शिपाई दुसऱ्या विंगेतून निघून जातो पडदा पडतो.)

## २३. चतुर बीरबल : भाग दुसरा

(दुरून दिलेल्या ललकाऱ्या ऐकू येतात – "राजाधिराज, सम्राट अकबर बादशहा येत आहेत." त्या ललकाऱ्यांच्या आवाजात पडदा वर जातो. वर जाणाऱ्या पडद्याला तुताऱ्यांची साथ मिळते. पाठोपाठ भालदार-चोपदारही जयजयकार करत प्रवेश करतात आणि सम्राट अकबर संथ पावले टाकत सिंहासनावर आरूढ होतात. बादशहाच्या आगमनाबरोबर दरबारातील सर्व मानकरी उठून उभे राहतात. त्रिवार जयजयकार करतात. बादशहा एक हात वर करून सगळ्यांना बसण्याचा इशारा करतो. सगळे आपापल्या जागी बसतात. दरबारातील सगळे लोक बसल्यानंतर अकबर बादशहा सगळ्यांकडे एकदा पाहून वझिराला विचारतो.)

अकबर : वझीर, बीरबलांची जागा घेण्यासाठी किती उमेदवार आले आहेत?

वझीर : (लवून मुजरा करून) खाविंद, एकूण पाच उमेदवार हजर आहेत.

(वझीर असं म्हणताच दरबाराच्या एका विशिष्ट ठिकाणी बसलेले पाचही उमेदवार उठून उभे राहतात आणि अदबीने वाकून अकबराला मुजरा करतात. त्यांतील एका दाढीवाल्याकडे अकबराचे लक्ष जाते. त्याच्याकडे पाहत अकबर विचारतो.)

अकबर : कोण आपण ?

दाढीवाला : (पुन्हा मुजरा करून) खाविंद, दवंडी ऐकून आलो आहे. आपल्या परीक्षेत उतरू इच्छितो.

अकबर : (छद्मी हसत) म्हणजे चतुर बीरबलांची जागा तुम्ही भरून काढू इच्छिता ?

दाढीवाला : हां जी, का नाही ?

अकबर : काही लिहिता-वाचता तरी येतं का ?

(यावर अकबर स्वतःही हसतो आणि इतर चार उमेदवारही हसतात.)

दाढीवाला : (दाढीवरून हात फिरवत) दाढीचे केस पांढरे झाले आहेत ते काही केवळ वयानं नाही सरकार. गेली पन्नास वर्षं म्हणजे उणंपुरं एक अर्धशतक आणि तपांच्या भाषेत बोलायचं तर चार तपांहूनही अधिक काळ माझं लेखन-वाचन चालू आहे. त्याच्या जोडीला चिंतन-मननही सुरू आहे. खूप हिंडलो आहे. अनुभवांची बरीच शिदोरी माझ्या पाठीशी आहे. नुसतं पंडिती ज्ञान माझ्याजवळ नाही. त्याला अनुभवांचा मोठा आधार आहे. आजवर मिळवलेल्या ज्ञानाचं इथं चीज होईल या आशेनं आलोय. आपली कीर्ती ऐकून आलोय. आणि चतुर बीरबलांची आपल्या दरबारातील उणीव मी भरून काढीन असा मला विश्वासही आहे. सरकार, मी आलोय ते मान खाली घालून परत जाण्यासाठी नाही.

अकबर : अरे वा! बरीच बढाई मारता!

दाढीवाला : खाविंद, आपल्याला ती बढाई वाटते... पण मी फक्त खरी ती गोष्ट सांगितली.

अकबर : हां हां, पण परीक्षेत उतरला नाही तर ?

दाढीवाला : आपण म्हणाल ते मला मंजूर आहे.

अकबर : ठीक ठीक. तर मग मी परीक्षेला सुरवात करतो. तुम्हा सगळ्यांना एकच प्रश्न विचारतो. या जगात सर्वांत प्रखर तेजानं कोण तळपतो ?

काही उमेदवार : सूर्य, सरकार.

(दाढीवाला नुसता हसतो.)

अकबर : (रोखून पाहत) का हसलात? उत्तर बरोबर नाही?

दाढीवाला : खाविंद, यांनी सांगितलं ते अर्धसत्य आहे. त्यांचं निम्मं उत्तर

बरोबर आहे.

अकबर :(चेहरा विचारमग्न करून, किंचित थांबून) म्हणजे ?

दाढीवाला : याचं पूर्ण उत्तर असं आहे – वर आभाळात सुर्य तळपतो आणि खाली पृथ्वीवर आपण सरकार.

अकबर : (खूश होऊन मान डोलवत) ठीक ठीक. आता सांगा – सूर्यालाही न दिसणारी वस्तू कोणती ?

(काही उमेदवार घोटाळलेले दिसतात. प्रश्नार्थक चेहऱ्याने एकमेकांकडे पाहू लागतात.)

एक उमेदवार : सूर्यालाही दिसत नाही असं या जगात काहीही नाही.

(दाढीवाला हसतो.)

अकबर : का हसला ?

दाढीवाला : खाविंद, सूर्यालाही दिसत नाही अशी एक गोष्ट आहे या जगात.

अकंबर : सांगा, कोणती ती ?

दाढीवाला : अंधार सरकार. एक रात्रीचा आणि... (अडखळत) नाही, नाही.

अकबर : आणि काय ?

दाढीवाला : आपण रागावणार नसाल तर बोलतो.

अकबर : ठीक आहे. बोला.

दाढीवाला : खाविंद, नुसतं ठीक आहे असं नव्हे. मला तसं वचन द्या. नाही तर सरकार, आपण माझं डोकं उडवाल.

अकबर : बोल, बोल, लवकर बोल. मी तुला अभय देतो.

दाढीवाला : ठीक आहे. खाविंद, एक रात्रीचा अंधार आणि दुसरा आपल्या राज्यकारभारातला.

अकबर : खामोश !

दाढीवाला : माफी असावी सरकार. आपण वचन दिलंय मला. आपण मनाला लावून घेऊ नये. मी म्हणतो हा राज्यकारभार खुद्द आपला नसुन, आपल्याला अंधारात ठेवून केला जाणारा राज्यकारभार.

अकबर : म्हणजे ?

दाढीवाला : याला जबाबदार आपले वझीर, प्रधान आणि इतर अंमलदार. ते सगळे अप्पलपोटे झाले आहेत. प्रजेवर अन्याय करून त्यांना लुबाडत आहेत. आपल्याला आणि सूर्यालाही न दिसणारा असा हा त्यांचा राज्यकारभार चालू आहे.

अकबर : असं, असं! आलं ध्यानात! सल्लामसलतीसाठी एखादा चतुर पंडित मिळाला, की करू यांचा बंदोबस्त. आज तुम्ही एक वेगळा प्रकाश टाकलात ते बरं झालं. आता सांगा, सर्वांत मोठं फूल कोणतं ?

एक उमेदवार : कमळ सरकार!

दुसरा उमेदवार : भोपळ्याचं फूल हे सर्वांत मोठं, सरकार.

(दाढीवाला पुन्हा हसतो. त्याच्याकडे पाहत अकबर विचारतो.)

अकबर : तुम्ही सांगता ?

दाढीवाला : सर्वांत मोठं फूल कापसाचं, सरकार.

(हे ऐकताच सर्व उमेदवार आश्चर्याने आ वासून पाहतात. अकबरही भुवया उंचावून त्याच्याकडे बघत विचारतो.)

अकबर : ते कसं ?

दाढीवाला : कारण त्यापासून लोकांना वस्त्र मिळतं.

अकबर : शाब्बास! आम्ही खूश आहोत तुमच्यावर. आता मी शेवटचा प्रश्न विचारतो. या दरबारातील प्रत्येकाच्या मनात आत्ता या क्षणी कोणता विचार चालू आहे ? द्याल याचं उत्तर ? जर बरोबर दिलंत, तर मी आपली बीरबलांच्या जागी नेमणूक करीन. नवरत्नांत एक मानाचं रत्न म्हणून तुम्हांला स्थान मिळेल.

(इतर उमेदवार गोंधळून जातात, गडबडतात. भुवया उंचावून एकमेकांकडे पाहू लागतात. दोघे-तिघे एकमेकांच्या कानाला लागून बोलतात. एकजण मात्र मोठ्या धैर्याने बोलतो.)

एक उमेदवार : सरकार, दरबारातल्या एवढ्या लोकांच्या मनांत या क्षणी कोणता एकच एक विचार चालू असेल हे कळणं कसं शक्य आहे ?

दुसरा उमेदवार : सरकार, जितक्या व्यक्ती तितक्या प्रकृती. एकाच वेळी अनेकांच्या मनांत अनेक विचार चालू असणार.

तिसरा उमेदवार : सरकार, लिहिलेलं वाचता येईल, बोललेलं ऐकता येईल; पण दुसऱ्याच्या मनातले विचार कसे सांगता येतील ? माणसाच्या मनात प्रवेश करता आला असता तर गोष्ट वेगळी.

(दाढीवाला मात्र गालातल्या गालात हसत उभा असतो. त्यांच्याकडे पाहून अकबर विचारतो.)

अकबर : काय, देता का याचं उत्तर ? बीरबलांची जागा घेण्यासाठी आला आहात ना ? स्वतःला मोठे पंडित म्हणूवन घेता ना ? मग द्या याचं उत्तर.

दाढीवाला : जशी आज्ञा महाराज. आत्ता या क्षणी दरबारातल्या प्रत्येकाच्या मनात एक आणि एकच विचार चालू आहे आणि तो म्हणजे –(एकेक शब्द सावकाश उच्चारत) आपल्या बादशहाची गादी सुरक्षित राहावी व बादशहा चिरायू व्हावेत, त्यांची भरभराट होत राहावी....

अकबर : काय म्हणता ?

दाढीवाला : होय सरकार. हाच एक विचार दरबारातील प्रत्येकाच्या मनात चालू आहे. आपल्याला काय वाटलं ? आता या क्षणी प्रत्येकाच्या मनात आपल्या परीक्षेला कोण उतरतो आणि बीरबलांची जागा कोण घेतो, असा विचार चालू असेल ? छे ! मुळीच नाही. सगळ्यांच्या मनात एकच विचार चालू आहे आणि तो म्हणजे केवळ आपल्याबद्दलचा. आणि हे खोटं असेल तर प्रत्येकाला विचारा.

अकबर : काय वझीर ?

वझीर : होय सरकार. या क्षणीच काय, माझ्या मनात तर सदैव तोच विचार चालू असतो.

पहिला सरदार :<br>दुसरा सरदार :<br>तिसरा सरदार : } होय सरकार, होय सरकार.

दाढीवाला : खाविंद, या स्पर्धेत उतरलेल्या उमेदवारांच्या मनातदेखील हाच विचार चालू असणार.

सर्व उमेदवार : होय सरकार, होय सरकार.

अकबर : (प्रसन्न हसत) आम्ही खूश आहोत ! बीरबलांपेक्षाही चतुर पंडित आम्हांला मिळाले. नाहीतरी अलीकडं ते फार शेफारलेच होते. त्यांना काढून टाकलं हे उत्तमच झालं.



दाढीवाला : खाविंद, मी बोलतो याची माफी असावी. काही झालं तरी बीरबल तो बीरबलच. आपण कितीही माझी स्तुती केली तरी मी बीरबलांची जागा घेऊ शकणार नाही.

अकबर : (आश्चर्याने) का नाही ?

दाढीवाला : कारण मी त्यांच्यापेक्षा हुशार नाही, त्याच्यापेक्षा चतुर मुळीच नाही.

अकबर : पण आम्हीं म्हणतो ना तुम्ही बीरबलांपेक्षाही चतुर आहात.

दाढीवाला : ही जरा चूक होते आहे सरकार. कारण (स्वत:शी हसत) बीरबला-पेक्षा बीरबलच अधिक चतुर कसा असेल ?

अकबर : (आश्चर्याने) म्हणजे ?

(बीरबल आपली खोटी दाढी काढून हातात घेत मुजरा करतो. यावर अकबर मोठ्याने हसतो.)

अकबर : वा! बीरबल, बहोत खूब! आमची चूक आम्हांला पटली.

(असे म्हणून बादशहा आपल्या गळ्यातील कंठा काढून त्याला बहाल करतो. तो पुन्हा एकदा मुजरा करतो आणि पडदा पडतो.)



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**सम्राट** – मोठ्या भूप्रदेशाचा राजा. **वझीर** – मुख्य प्रधान. **नवरत्ने** – अकबर बादशहा हा गुणी माणसांचा चहाता होता. कवी, चतुर पंडित, कलावंत, हकीम अशा नऊ विशेष गुणी व्यक्तींना त्याने आपल्या दरबारात आश्रय दिला होता. त्यांना 'नवरत्ने' असे म्हणत. अशा नऊ रत्नांत बीरबल हा एक होता. **निनाद** – आवाज. **राजाधिराज** – राजांचा राजा; बादशहा. **ललकारी** – आरोळी; पुकारा. **शान** – डौल; दिमाख. **खाविंद** – महाराज; सरकार. **पाणउतारा** – अपमान;

अवहेलना; मानहानी. **बहाणा** – ढोंग; खोटी सबब. **अभिषेक** – विधिपूर्वक स्नान; तळाला भोक असलेल्या भांड्यातून दूध, पाणी वगैरेंनी देवाच्या मूर्तीवर सतत धार धरणे. **शिरसावंद्य** – आदरणीय; अतिशय पूज्य. **उपर** – आणखी; नंतर. **तामिली** – अंमलबजावणी. **शेरास सव्वाशेर** – एकापेक्षा एक वरचढ. **चिरायू** – दीर्घायुषी; पुष्कळ आयुष्य लाभलेला.

**प्रश्न व स्वाध्याय** ( भाग १ व २ वरील ) :

१. दरबार भरताच बादशहाला प्रामुख्याने कोणती जाणीव झाली ?
२. बीरबलाविषयी अभिमान वाटेल अशा त्याच्या कोणत्या गुणांचा उल्लेख अकबराने केला आहे ?
३. बीरबलाविरुद्ध सर्व प्रधानांनी अकबराजवळ कोणत्या तक्रारी केल्या ? त्याचा परिणाम कोणता झाला ?
४. बीरबलाच्या जागी कोणाची नेमणूक करावी, असे बादशहाच्या मनात आले ?
५. अकबराच्या दरबारात आणखी कोणकोणते गुणी लोक होते ?
६. दाढीवाल्या म्हाताऱ्याला अकबराने कोणकोणते प्रश्न विचारले ? त्याने त्यांची कोणती उत्तरे दिली ?
७. बीरबलाने दिलेल्या सर्व उत्तरांवरून त्याचे कोणते विशेष गुण लक्षात येतात ?
८. (अ) उलट अर्थाचे शब्द सांगा :
   भाग्य, सावध, नम्र, स्पष्ट, योग्य, खोटे.
   (आ) 'शेरास सव्वाशेर' अशाच अर्थाची म्हण कंसात दिलेल्या म्हणींतून शोधा व तिचा वाक्यात उपयोग करा.
   (जशास तसे, बापसे बेटा सवाई, करावे तसे भरावे.)
   (इ) खालील प्रत्येक वाक्यातील 'सर' या शब्दाचा अर्थ समजून घ्या.
   १. बीरबलाच्या चातुर्याची **सर** कोणाला येणार नाही.
   २. तानाजीने सिंहगड **सर** केला.
   ३. पावसाची **सर** येताच सर्वांना आनंद झाला.
   ४. मावशीने आणलेला मोत्यांचा **सर** सरिताला खूप आवडला.
   (ई) 'भालदार','चोपदार' या शब्दांत शेवटी 'दार' असा शब्द आहे. अशाच प्रकारचे पाच शब्द लिहा.
   (उ) हे नाट्यकले सादर करण्यासाठी कोणकोणती पूर्वतयारी करावी लागेल, याचा तुम्ही सर्वजण विचार करा व एक टिपण तयार करा.
९. तुमच्या शाळेच्या स्नेहसंमेलनात हे नाट्यकले सादर करा.

## २४. कोण गे आई ?

नदीच्या शेजारी, गडाच्या खिंडारी,
झाडांच्या ओळींत, वेलूंच्या जाळीत,
कोण गे त्या ठायी राहते गे आई ?

चिंचांच्या शेंड्यांना, वडांच्या दाढ्यांना,
ओढोनी हालवी कोण गे पालवी ?
कोण गे त्या ठायी राहते गे आई ?

कोण गे जोराने मोठ्याने, मोठ्याने
शीळ गे वाजवी, पाखरा लाजवी ?
कोण गे त्या ठायी राहते गे आई ?

वाळली सोनेरी, पाने गे चौफेरी,
मंडळ धरोनी नाचती ऐकोनी,
कोण गे त्या ठायी राहते गे आई ?
झाडांच्या साउल्या नदीत कापल्या !
हाका मी मारिल्या, वाकोल्या ऐकिल्या,
कोण गे त्या ठायी राहते गे आई ?



**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**खिंडार** – भगदाड. **मंडळ धरणे** – फेर धरणे; गोलाकार फिरणे. **वाकुली** – वेडावून दाखवणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. 'कोण गे त्या ठायी राहते गे आई?' या प्रश्नाचे उत्तर आईने काय दिले असेल ?
२. वारा कुठेकुठे राहतो असे या कवितेत दिसून येते ?
३. वारा कायकाय करतो ?
४. 'वडाच्या दाढ्या' म्हणजे काय ?
५. झाडांच्या सावल्या मुलाला कोठे व कशा दिसल्या ?
६. 'शीळ गे वाजवी,पाखरा लाजवी?' याचा अर्थ पाखरांना लाजवील अशी गोड शीळ. यासारखी खालील वाक्ये पूर्ण करा :
   (अ) -------लाजवील असा खादाड माणूस.
   (आ) -------लाजवील असा झोपाळू माणूस.
   (इ) --------लाजवील असा दानशूर माणूस.
   (ई) --------लाजवील असा शक्तिवान माणूस.

# २५. गाव तिथं गोबरगॅस

त्या दिवशी आम्ही पहाटेच शाळेत जमलो. प्रत्येकाने आपल्याबरोबर दशम्या घेतल्या होत्या. विटीदांडू, चेंडू, पत्ते, बाजा, बासरी असे साहित्य बरोबर होतेच. सहल जायची होती सखाराम पाटलांच्या मळ्यात. त्यांचा बापू आमच्या वर्गात होता. मळा फार दूर नव्हता. गावापासून ३-४ किलोमीटर असेल.

आम्ही गाणी गात पायीच मळ्याकडे निघालो. मळ्यावर आल्यावर छान वाटले. ज्वारीची कणसे वाऱ्यावर डुलत होती. ऊस तुऱ्यावर आला होता. भाजीचे हिरवेगार वाफे तरारले होते. विहिरीवरचे इंजिन चालू होते. पाटातून पाणी खळाळत वाहत होते. एका बाजूला कौलारू घर होते. पलीकडे काही अंतरावर जनावरांचा गोठा होता.



आम्ही मळ्यावर पोचलो, तेव्हा सखाराम पाटील आणि बापू आमची वाट पाहत उभे होते. पाटील म्हणाले, "या, या. तुमचीच वाट पाहत होतो. त्या तिकडं आंब्याच्या झाडाखाली सामान ठेवा. मग आपण शेतात एक फेरफटका मारून येऊ."

झाडाच्या दाट सावलीत आमच्या पिशव्या आणि इतर सामान आम्ही ठेवले. पाटाच्या वाहत्या पाण्यात हातपाय धुतले. एकदम कसे छान वाटले! सगळा शीण गेला. पाटलांनी आम्हांला प्यायला दूध दिले.

मग आम्ही आणि आमचे गुरुजी पाटलांच्याबरोबर निघालो. मळ्यातल्या पिकांची, भाजीपाल्याची पाटील माहिती देत होते. फिरतफिरत आम्ही सिमेंटच्या एका गोलाकार टाकीपाशी आलो. सिमेंटची ही टाकी जमिनीवरच उघडी बांधली होती. टाकीला जोडलेले नळ शेतात खेळवले होते. त्यांतला एक नळ बाजूच्या त्या कौलारू घराकडे गेलेला दिसत होता. ती टाकी आणि ते नळ पाहून मी म्हटले, "गुरुजी, केवढी मोठी ही पाण्याची टाकी!"



पाटील म्हणाले, "ही काही पाण्याची टाकी नाही. ती आहे गोबरगॅसची."

माझे कुतूहल वाढले. मी विचारले, "गॅसची टाकी ? तुम्ही मळ्यात कसा काय गॅस आणला ?"

पाटील हसून म्हणाले, "सांगतो. गॅस बाहेरून आणलेला नाही, तो इथंच तयार केला."

मी पुन्हा विचारले, "इथंच ? तो कसा ?"

पाटील सांगू लागले, "ह्या वरच्या उपड्या टाकीसारखी दुसरी एक टाकी जमिनीखाली आहे. त्या टाकीत शेण, मूत, केरकचरा टाकला, की ती घाण सोनं देते सोनं."

असे म्हणून पाटलांनी आम्हांला ती जमिनीखालची टाकी कोठे आहे ते दाखवले. मग गुरुजीही माहिती देऊ लागले, " या खालच्या टाकीत शेण, मूत, मैला जमा होतो. शिवाय शेळ्यामेंढ्यांच्या लेंड्याही यात टाकता येतात. गाळात व घाणीत उगवणारं शेवाळ, गाजरगवत, तण, अगदी आपली उष्टी-खरकटीदेखील. हे सगळं या टाकीत टाकलं, की त्याचा एक रांधा तयार होतो. त्यातून मग गॅस मिळतो. हा गॅस घाणीपासून तयार होत असला तरी त्याला घाण वास अजिबात येत नाही. या गॅसवर विहिरीवरचं इंजिन चालवता येतं. शिवाय गॅसपासून प्रकाश मिळतो. दिवे लावता येतात. सैपाकदेखील करता येतो."

एकाने विचारले, "म्हणजे आता प्रत्येक खेड्यात गॅस मिळू शकेल ?"

पाटील म्हणाले, "का नाही मिळणार ? सगळ्यांनी मनावर घेतलं, गावातली घाण गोळा केली, की गाव तर स्वच्छ होईलच, शिवाय गॅसही मिळेल."

मी म्हटले," मोठी टाकी बांधावी लागेल अन् खूप खर्च येईल."

पाटलांनी सांगितले, "टाकी मोठी बांधावी लागेल. जो काही खर्च येईल तो एकदाच करायचा. पण सगळ्या गावाला फायदा होईल. होणाऱ्या फायद्याच्या मानानं तसा खर्च कमीच होतो. शिवाय त्याचा आणखी एक फायदा असा – या टाकीतून चांगलं ओलं खत मिळतं. ते शेतात टाकलं, की छान पीक येतं."

लगेच गुरुजी म्हणाले," खत मिळे शेताला, धन लागे हाताला! 'गाव तिथं गोबरगॅस असं झालं, तर आपल्या खेड्यांचं रूप किती बदलेल! "

बोलता बोलता वेळ कसा भर्रकन निघून गेला हे कळलेही नाही. सूर्य माथ्यावर आला. सपाटून भूक लागली. आम्ही सगळे झाडाच्या सावलीत आलो. पाटाच्या पाण्यात पुन्हा हातपाय धुतले. सगळ्यांच्या दशम्या एकत्र केल्या. पाटलांनी सगळ्यांना दहीताक दिले. गप्पा मारत मारत सगळ्यांनी चांगला ताव मारला.

जेवण होताच गुरुजी म्हणाले, "आता जागा स्वच्छ करा. सगळं उष्टं-खरकटं गोळा करून मुलांनो, काय करायचं ?"

आम्ही सगळे एकदम म्हणालो, "टाकीत टाकायचं."

गुरुजी म्हणाले, "शाब्बास! "

लगेच आम्ही जागा साफ केली. उष्टीखरकटी टाकीत टाकली. थोडा वेळ आराम करून आम्ही एकत्र जमलो. कोणी नकला केल्या, कोणी गाणी म्हटली. मी बासरी वाजवून दाखवली. तोपर्यंत संध्याकाळ झाली. सखाराम पाटील व बापू यांचा निरोप घेऊन आम्ही परत निघालो.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**दशमी** – पीठ दुधात मळून केलेली भाकरी किंवा चपाती. **तुऱ्यावर येणे** – पूर्ण वाढ होणे. **तरारणे** – तजेलदार; टवटवीत दिसणे. **फेरफटका मारणे** – चक्कर मारणे; इकडेतिकडे फिरणे. **शीण** – थकवा; दमणूक. **कुतूहल**- जाणून घेण्याची उत्सुकता. **उपडा** – पालथा; तोंड खाली केलेला. **रांधा** – काला; लगदा; घुसळून एकत्र केलेले मिश्रण. **ताव मारणे** – भरपेट खाणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. सहल कोठे गेली होती ? मुलांनी तेथे नवीन काय पाहिले ?
२. गोबरगॅस कसा तयार होतो ?
३. गोबरगॅसचा कायकाय उपयोग होतो ?
४. गोबरगॅसवर स्वयंपाक करता येऊ लागल्याने कोणकोणते फायदे होतात ?
५. 'खत मिळे शेताला, धन लागे हाताला' यावर एक छोटा परिच्छेद लिहा.
६. (अ) 'पाटील'पासून 'पाटीलकी' असा शब्द करता येतो. खाली दिलेल्या शब्दांपासून असे नवे शब्द तयार करा :
सुतार, सोनार, लोहार, शाब्बास, गाव.
(आ) 'हिरवे' या शब्दाला 'गार' हा शब्द लावून 'हिरवेगार' हा शब्द झाला. तसेच पुढील शब्दांना योग्य शब्द लावा :
पिवळा, पांढरा, काळा, निळा, लाल.

# २६. इच्छा तिथं मार्ग

शाळेची घंटा घणघणली. भराभरा मुले वर्गात जाऊ लागली. गुरुजीही वर्गात आले. सगळी मुले आपापल्या जागेवर बसली. गुरुजींनी हजेरी मांडायला सुरुवात केली. एकेकाची हजेरी मांडत ते एकतिसाव्या नावावर आले. 'राजू पवार' हे नाव त्यांनी पुकारले.

'नमस्ते' असा आवाज आला नाही, म्हणून त्यांनी मान वर करून पाहिले. नेहमीप्रमाणे राजू आपल्या जागेवर नव्हता. इतक्यात त्याच्याच चाळीत राहणारा मुलगा म्हणाला, "गुरुजी, तो काल लोकलमधून पडला."

हे शब्द कानी पडताच गुरुजींसह सारा वर्ग त्या मुलाकडे पाहू लागला. वर्गात किंचित चुळबुळ सुरू झाली. काय बोलावे हे क्षणभर कोणालाच समजेनासे झाले.

राजू हा गुणी मुलगा होता. एखादया दिवशी त्याला यायला उशीर झाला, तर तो वर्गाच्या दाराशी येऊन थांबायचा. 'गुरुजी, आत येऊ ?' असे तो विचारायचा. परवानगी घेऊनच तो आत यायचा. अशा या राजूला अपघात झाला आहे, हे समजताच गुरुजी त्या मुलाला म्हणाले, "कितपत लागलंय हे तू पाहिलंस का ?"

तो म्हणाला, "नाही. तो लोकलमधून पडला असं शेजारी बोलत होते."

गुरुजी म्हणाले, "उदया येताना त्याला भेटून, विचारपूस करून ये."

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे गुरुजी हजेरी मांडायला सुरवात करणार, इतक्यात "गुरुजी, आत येऊ ?" हे शब्द त्यांच्या कानावर आले. मान वर करून त्यांनी पाहिले. राजू पवार दाराशी उभा असलेला त्यांना दिसला. सारेजण आश्चर्याने त्याच्याकडे पाहू लागले. राजूला पाहताच साऱ्या मुलांना आनंद झाला. जवळ बोलावून त्याच्या पाठीवर हात फिरवत गुरुजी त्याची विचारपूस करू लागले.

राजूचे उजवे कानशील काळेनिळे झाले होते. एका डोळ्याची भुवई सुजली होती. गालावर कसलासा लेप लावलेला दिसत होता.



गुरुजी म्हणाले, "अरे, असा कसा पडलास तू ?"

राजू सांगू लागला, "काल लोकलच्या डब्यांत खूप गर्दी होती. त्या रेटारेटीतून मी कसाबसा बाहेर पडलो. दुसरी लोकल समोर उभीच होती. ती पकडायला धावलो. इतक्यात गाडी सुटली. त्या धावत्या गाडीत चढण्याचा मी प्रयत्न केला; पण माझा हात सुटला आणि मी फलाटावर धाडकन पडलो. माझ्या हातातील गोळ्यांचा डबाही बाजूला फेकला गेला. सगळ्या गोळ्या फलाटावर पसरल्या."

गुरुजी म्हणाले, "गोळ्यांचा डबा ? कसल्या गोळ्या ?"

इतक्यात एक मुलगा मध्येच म्हणाला, "गुरुजी, तो लोकलमध्ये गोळ्या विकतो."

हे ऐकताच राजूला त्यांनी विचारले, "खरं का हे ?"

त्याने नुसती होकारार्थी मान हलवली.

गुरुजींनी पुन्हा विचारले, "घरी कोणकोण आहेत तुझ्या ?"

राजू बोलला, "आईवडील आणि दोन लहान भावंडं आहेत."

"वडील काय करतात ?"

"ते घरीच असतात."

नीट बोध झाला नाही म्हणून त्यांनी पुन्हा विचारले,

"वडील घरीच असतात म्हणजे ?"

तो म्हणाला, "ते सारखे आजारी असतात, म्हणून त्यांची नोकरी गेली. आई चार घरची धुणीभांडी करते. तिला मी थोडीफार मदत करतो."

गुरुजींनी विचारले, "कसली मदत करतोस तू ?"

तो सांगू लागला, "शाळा सुटली की मी घरी जातो. काहीतरी थोडं खातो आणि मग चर्चगेटपासून विरारपर्यंत लोकलमध्ये गोळ्या विकतो. एक स्टेशन जाऊन दुसरं आलं, की लगेच दुसऱ्या डब्यात शिरतो. एक गाडी फिरून झाली, की दुसऱ्या गाडीत चढतो. घरी परत यायला मला केव्हाकेव्हा रात्रीचे बाराही वाजतात."

गुरुजींनी विचारले, "एवढी धडपड करून रोज पैसे तरी किती मिळतात तुला ?"

"कधी दोन रुपये तर कधी तीन रुपये सुटतात. जे काही मिळतात ते आईकडं देतो."

यावर गुरुजी म्हणाले, "अरे, मग अभ्यास केव्हा करतोस?"

तो सांगू लागला, "रात्री दमून आलो की लगेच झोपतो. सकाळी लवकर उठतो. जेवढा वेळ मिळतो तेवढा वेळ अभ्यासात घालवतो. आई कामाला गेली, की मला माझ्या भावंडाकडंही बघावं लागतं. मात्र सुटीच्या दिवशी राहिलेला सगळा अभ्यास मी भरून काढतो."

राजू सांगत होता. सारा वर्ग स्तब्ध होऊन ऐकत होता. त्याचे बोलून झाल्यावर त्याची पाठ थोपटत गुरुजी म्हणाले, "शाब्बास राजू! विद्येवर



असं प्रेम हवं. तुझी ही जिद्द आणि धडपड पाहून मला फार धन्यता वाटते. इच्छा तिथं मार्ग हेच खरं. तुझ्यासारखा विद्यार्थी आपल्या वर्गात आहे याचा कोणाला अभिमान वाटणार नाही ?" असे म्हणून त्यांनी वर्गाकडे पाहिले.

गुरुजींचे हे वाक्य संपते न संपते तोच वर्गात टाळ्यांचा कडकडाट झाला.



**शब्दार्थ:** ****************************

**पुकारणे** – मोठ्याने उच्चारणे. **कानशील** – कान व गाल यांच्यामधील भाग. **लेप** -(औषधाचा)थर. **फलाट** – स्टेशनवर गाडीतील उतारूंना चढउतार व जा-ये करण्यासाठी ठेवलेली मोकळी जागा. **लोकल** – स्थानिक रेल्वेगाडी ; मोठ्या शहरांतून उपनगरांतील प्रवाशांच्या सोयीसाठी जा-ये करणारी रेल्वेगाडी.

**प्रश्न व स्वाध्याय:** -

१. राजू हा गुणी मुलगा होता हे कोणत्या गोष्टींवरून दिसून येते ?
२. राजूच्या घरी कोणकोण होते ?
३. राजू गोळ्या का विकत असे ?
४. राजू आपला अभ्यास केव्हा करत असे ?
५. गुरुजींनी राजूला शाबासकी का दिली ?
६. (अ) आईला 'माता', 'जननी' असे आणखी शब्द आहेत. तसेच पुढे दिलेल्या शब्दांना आणखी कोणकोणते शब्द आहेत ते सांगा.
बाप, भाऊ, बहीण, गुरुजी, मुलगी, मुलगा.
(आ) एक असली तर आपण 'गोळी' म्हणतो. अनेक असल्या तर 'गोळ्या' म्हणतो. मात्र एक असले तर 'गुरुजी' म्हणतो, व अनेक असले तरी 'गुरुजी'च म्हणतो. त्यात बदल होत नाही. पुढे दिलेल्या वस्तू अनेक असल्या तर त्यांना काय म्हणतात ते सांगा.
खांब, देऊळ, उंदीर, घर, बैल, गाय, वाघ, वही, मांजर.
(इ) 'इच्छा तिथं मार्ग' हे वचन वळणदार अक्षरांत कागदावर लिहून त्याभोवती अक्षराकारी वेलबुट्टी काढा.

# २७. सावित्रीबाई फुले

शे-सव्वाशे वर्षांपूर्वीची गोष्ट.

जोतीराव फुले पुण्यात राहत. ते गोरगरीब लोकांची सेवा करत. सर्वांनी लिहायला-वाचायला शिकावे असे त्यांना वाटे. शिक्षण घेतले की ज्ञान मिळते, ज्ञान मिळाले की गरिबी दूर होते. माणूस विद्येने मोठा होतो, म्हणून आपण शिकले पाहिजे, असे ते सांगत.

जोतीरावांच्या पत्नी म्हणजे सावित्रीबाई. त्याही शिकल्या नव्हत्या. जोतीराव सावित्रीबाईंना म्हणत, 'एक पुरुष शिकला, तर तो एकटा शहाणा होतो. पण एक बाई शिकली तर सगळं कुटुंब शहाणं होतं.'

सावित्रीबाई नायगाव येथे जन्मल्या. सातारा जिल्ह्यातील खंडाळा तालुक्यात हे गाव आहे. वयाच्या नवव्या वर्षी जोतीरावांशी त्यांचे लग्न झाले. त्यांना लिहिता-वाचता येत नव्हते. जोतीरावांनी त्यांना लिहायला-वाचायला शिकवले. त्यांना वाचायची गोडी लागली. त्या खूपखूप वाचू लागल्या. त्या कविताही करत. एक दिवस काय झाले – जोतीराव विचारात दंग झालेले दिसले. सावित्रीबाईंनी विचारले, "अहो, कसली काळजी करता एवढी ?"



जोतीराव म्हणाले, "हे बघ, आपण बुधवारपेठेत शाळा सुरू केली आहे ना ?"

"हो, कशी काय चालली आहे ती ?"

जोतीराव म्हणाले, "तशी बरी चालली आहे. पण..."

"पण काय ? थांबलात का असं ? काही अडचणी आहेत का ?"

विचारमग्न झालेले जोतीराव म्हणाले, "अडचणी तर खूप आहेत."

सावित्रीबाई बोलल्या. "मला त्या निवारता येण्यासारख्या आहेत का ? मी काही मदत करू का ?"

सावित्रीबाईंनी अगत्याने असे विचारल्यावर जोतीरावांना आनंद वाटला. ते म्हणाले, "हो, तू मदत करू शकतेस. शिकवण्याचं काम तू सांभाळ. तू शिकवायला आलीस, तर शिकायला येणाऱ्या मुलींची संख्या वाढेल."

सावित्रीबाई आनंदाने म्हणाल्या, "मी जरूर येईन. सध्या किती मुली आहेत ?"

"आहेत सहा-सात."

जोतीरावांना धीर देत सावित्रीबाई म्हणाल्या," असू द्या. या मुलींना चांगलं शिकवू. इतर मुली हळूहळू येतील."

बुधवारपेठेतील या शाळेत सावित्रीबाई शिकवायला जाऊ लागल्या. मुलींनी शिकावे हे त्या काळी लोकांना पसंत नव्हते. बायकांच्या जातीला शिकून काय करायचं? असे लोक म्हणत. इथे तर एक बाई शाळेत शिकवायला निघाली! काही लोक यामुळे बिथरले. नाना तऱ्हांनी त्रास देऊ लागले. त्यांच्या या त्रासाला कसले ताळतंत्रही राहिले नाही.

सावित्रीबाई शाळेत निघाल्या, की रस्त्यावरचे लोक फिदीफिदी हसत. बोट करून दाखवत. काही वेळेला अचकट-विचकटही बोलत आणि कधीकधी दगडगोटे मारत, शेणगोळेही टाकत; पण सावित्रीबाई मोठ्या धीराच्या. त्यांनी ते सर्व शांतपणे सहन केले. इतकेच नव्हे, तर अशा लोकांना त्या म्हणत, माझ्या भावांनो, तुमच्या व माझ्या धाकट्या बहिणींना मी शिकवते. तुम्ही

खुशाल दगड मारा, शेणगोळे फेका. हाती घेतलेलं हे काम मी सोडणार नाही.

सावित्रीबाई जशा बोलल्या तशा वागल्या. जोतीरावांना आपल्या पत्नीचा केवढा अभिमान वाटे! त्यांनी गोरगरीब, दलित-पीडित या सगळ्यांना जवळ केले. शिवाशीव मानली नाही. स्वत:च्या घरातील आडाचे पाणी त्यांनी दलितांना भरू दिले. हा हिंदू, तो मुस्लिम, हा ख्रिश्चन, तो शीख असा भेदभाव ते करत नव्हते. जातपात मानत नव्हते.

जोतीराव मरण पावल्यानंतरही सावित्रीबाईंनी आपले समाजकार्य पुढे चालू ठेवले. १८९७ मध्ये प्लेगची भयंकर साथ सुरू झाली. ही साथ खेडोपाडी पसरली. अशा साथीच्या वेळी लोक भीतीने घरेदारे सोडून रानात जात. गावेच्या गावे ओस पडत. अशात कोणी प्लेगने आजारी पडला तर त्याची सेवा करायला कोण तयार होणार ?

पण सावित्रीबाई डगमगल्या नाहीत. त्या पुढे झाल्या. अशा लोकांची सेवा करू लागल्या. दुर्दैवाने एका रोग्याला दवाखान्यात नेता नेता त्यांनाही प्लेगने



गाठले:गोरगरिबांची, दीनदुबळ्यांची, अनाथअपंगांची आणि रोग्यांची सेवा करता करता त्यांनी आपला देह ठेवला.

सावित्रीबाई या जगातून गेल्या; पण कीर्तिरूपाने त्या मागे राहिल्या.

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**दंग होणे** – गुंगून जाणे. **विचारमग्न** – विचारात गढून गेलेला. **आड** – घराच्या आवारात असलेली छोटी अरुंद विहीर. **समाजकार्य** – लोकांच्या कल्याणाचे काम. **ताळतंत्र न राहणे** – कोणतेही नियम न मानणे; बेताल होणे. **साथ** – संसर्गजन्य रोग. **प्लेगची साथ** – उंदीर पडून त्यावरील पिसवा चावल्याने फैलावणारा एक संसर्गजन्य रोग. या रोगात खूप ताप येऊन काखेत गाठ येते व पुष्कळदा रोगी दगावतो.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. माणसाने शिकले पाहिजे असे जोतीराव फुले का सांगत ?
२. '...एक बाई शिकली तर सगळं कुटुंब शहाणं होतं.' असे ते का म्हणत ?
३. शाळेला जाताना सावित्रीबाईंना कोणकोणता त्रास सहन करावा लागला ?
४. त्रास देणाऱ्या लोकांना सावित्रीबाई काय म्हणाल्या ?
५. दुसऱ्याची सेवा करताना सावित्रीबाईंनी स्वतःच्या जिवाची पर्वा केली नाही, असे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते ?
६. (अ) जोड्या लावा

| | |
|---|---|
| दलित | अपंग |
| दीन | पात |
| अनाथ | दारे |
| जात | पीडित |
| घरे | दुबळे |

(आ) 'साथ' या शब्दाचा एक अर्थ 'रोगाचा फैलाव' असा आहे. दुसरा अर्थ 'सोबत', संगत असाही आहे. खाली काही शब्द दिले आहेत. त्यांचे दोन-दोन अर्थ द्या

आड, कुटुंब, गोटा, पात, जग.

(इ) 'माणूस विद्येने मोठा होतो' हा एक सुविचार आहे. यासारखे या पाठात असलेले आणखी काही सुविचार शोधा आणि ते लिहून ठेवा.



# २८. सोनुला

भारी अवखळ
माझा ग वेल्हाळ,
खेळून भागला.
नीज नीज बाळा.

नका येऊ कोणी,
नका जाऊ कोणी.
वाजेल पाऊल,
उठेल ग बाळ.

वाऱ्या वाहू नको.
मैने, गाऊ नको.
उठेल सोनुला,
आताच झोपला.

नका चिऊकाऊ,
अंगणात येऊ.
पंख वाजतील,
दचकेल बाळ.

जा रे, पाखरांनो,
बालगोपाळांनो,
नका होऊ गोळा.
सौंगडी झोपला.



**शब्दार्थ:** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**वेल्हाळ** – लाडका. **सौंगडी** – मित्र. **भागणे** – दमणे.

**प्रश्न व स्वाध्याय:**

१. आई आपल्या बाळाचा उल्लेख कोणकोणत्या शब्दांनी करते ?
२. आपला बाळ झोपेतून उठू नये म्हणून आई कोणाकोणाला कायकाय सांगते ?
३. चिऊकाऊ = चिऊ आणि काऊ. यासारखे आणखी काही शब्द सुचवा.
४. या कवितेतील कोणत्याही एका पक्ष्याचे पाच-सहा वाक्यांत वर्णन करा.
५. वडीलधाऱ्या मंडळींना विचारून आणखी काही अंगाई गीते मिळवा व ती लिहून ठेवा.

## २९. तेल गेले, तूप गेले ...

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट. एका गावात एक गृहस्थ राहत होते. त्यांचा एक नोकर होता. गेनू हे त्याचे नाव. गेनू होता स्वभावाने गरीब, दिसायला भोळसर अन् वागण्यात थोडा धांदरट. मात्र त्याच्या कष्टाळूपणामुळे मालकाला तो फार आवडे.

गेनूचे मालक होते धार्मिक. त्यांच्या गळ्यात नेहमी तुळशीच्या मण्यांची एक माळ असे. पंढरीचे वारकरी गळ्यांत घालतात तसली. एक दिवस अंघोळीनंतर अंग पुसताना त्यांची ती माळ अचानक तुटली. सारे मणी ओघळून न्हाणीघरात सगळीकडे पसरले. गेनूने ते सर्व मणी वेचले. एका वाटीत भरून ठेवले आणि आपल्या मालकाकडे ते नेऊन दिले.

दुपारच्या वेळी मालक गेनूला म्हणाले, "गेनू, हा सुईदोरा घे, अन् या वाटीतील मण्यांची मला माळ करून दे."

मालकाच्या आज्ञेप्रमाणे गेनू मणी ओवू लागला. बराच वेळ झाला तरी गेनूची माळ काही पुरी होत नव्हती. मालक वाट पाहून कंटाळले. शेवटी गेनू बसला होता तिथे जाऊन पाहिले. तो एका बाजूने मणी ओवत होता, तर दुसऱ्या बाजूने ते ओघळून जात होते. दोऱ्याच्या दुसऱ्या टोकाला गाठ मारायची राहून गेली होती. माळ पुरी होणार कशी ?



गेनूच्या मालकांनी एकदा यात्रेला जायचे ठरवले. त्या वेळी आजच्या-सारखी वाहने नव्हती. ते बैलगाडीने प्रवासाला निघाले. गेनूही बरोबर होता. एके दिवशी संध्याकाळी ते एका गावी आले. गावात कोठे उतरायची सोय नव्हती. गावाबाहेरच्या देवळात त्यांनी मुक्काम केला.

रात्रीच्या जेवणासाठी त्यांना स्वयंपाक करणे भाग होते. स्वयंपाकापुरती भांडी त्यांच्याजवळ होती. तांदूळ, पीठ, मीठमिरची वगैरे जिन्नस त्यांनी आपल्याबरोबर घेतले होते. देवळाच्या ओवरीत तीन दगडांची एक चूल होती. तिथेच भातपिठले करायचे त्यांनी ठरवले.

चूल पेटवण्यापूर्वी मालकांच्या लक्षात आले, की तेल व तूप बरोबर घ्यायचेच विसरले. त्यांनी गेनूला वाण्याच्या दुकानात जाऊन तेल व तूप आणायला सांगितले.

या दोन जिनसांसाठी गेनूला दोन भांडी हवी होती. ती मिळवायची कोठून याचा तो विचार करू लागला. इतक्यात त्याचे लक्ष देवापुढे ठेवलेल्या एका पितळी भांड्याकडे गेले. देवापुढे धूप जाळण्यासाठी ठेवलेले ते धुपाटणे होते. त्या धुपाटण्याच्या दोन्ही बाजू खोलगट होत्या. गेनूला वाटले, तेल अन् तूप आणायला हे एकच भांडे पुरेल. देवापुढचे ते धुपाटणे घेऊन तो बाहेर पडला.

गेनू थेट वाण्याच्या दुकानी गेला. त्याने वाण्याला प्रथम तेल मागितले. वाणी तेल देऊ लागला, तेव्हा त्याने धुपाटणे पुढे केले व धुपाटण्याच्या वरच्या भागात तेल घेतले. वाणी तूप आणण्यासाठी आत गेला. तेवढ्यात तुपासाठी त्याने धुपाटणे उलटे केले. वाण्याने त्यात तूप दिले. धुपाटणे उलटे करताना घेतलेले तेल तिथेच जमिनीवर सांडले. ही गोष्ट गेनूच्या लक्षात आली नाही.

भांड्यात तूप घेऊन गेनू देवळाकडे परतला. मालक त्याची वाटच पाहत होते. गेनूने भांडे मालकापुढे ठेवले. ते गेनूला म्हणाले, "अरे,तू फक्त तूप आणलेलं दिसतं, तेल कुठं आहे ? विसरलास वाटतं ?"

गेनू लगेच म्हणाला, "छे! विसरेन कसा ? हे पहा ना, तेलही आणलंय."

असे म्हणून घाईत त्याने धुपाटणे सुलटे करून ठेवले. त्यामुळे आणलेले तूपही जमिनीवर सांडले. तेल तर दुकानातच सांडले होते.

अशा रीतीने, तेल गेले, तूप गेले, हाती धुपाटणे आले.



**प्रश्न व स्वाध्याय :**

१. गेनू आपल्या कोणत्या गुणामुळे मालकांना आवडत असे ?

२. तेल व तूप आणण्यासाठी गेनूने धुपाटणेच का नेले ?

३. गेनू धांदरट होता हे कोणत्या प्रसंगांवरून समजते ?

४. (अ) 'विठोबाने बाजारातून मीठमिरची आणली' या वाक्यातील 'मीठमिरची' याचा अर्थ 'मीठ' व मिरची' अशा दोनच वस्तू नसून त्याखेरीज तसल्याच आणखी काही वस्तू असा होतो. 'मीठमिरची' या शब्दासारखे आणखी काही शब्द सांगा.

(आ) 'तेल गेले, तूप गेले, हाती धुपाटणे आले,'ही म्हण वर दिलेल्या दंतकथेवरून आली असे मानतात. अशाच प्रकारच्या काही म्हणींच्या मागे असलेल्या गोष्टी तुमचे गुरुजी किंवा वडीलधारी मंडळी यांच्याकडून मिळवा व वर्गात मित्रांना सांगा.

# ३०. रविवारचा शोध

आनंदला रविवार फार आवडे. कारण त्या दिवशी त्याला खूप खेळायला मिळे. कधी एकदा रविवार येतो याची तो वाटच बघत असे. एकदा त्याच्या मनात आले, की अशी वाट पाहण्यापेक्षा त्यालाच जाऊन आपण भेटावे; पण हा रविवार राहतो कोठे, हेच त्याला माहीत नव्हते.

एक दिवस सकाळी उठवताना आई त्याला म्हणाली, "आनंदा, अरे, ऊठ." सकाळ झाली. सोमवार उजाडला." त्याने डोळे उघडले. खिडकीतून बाहेर पाहिले. त्याला सुर्य उगवताना दिसला. त्याला वाटले, की हा सूर्यच आपल्याबरोबर रोज कोणता तरी नवा दिवस घेऊन येतो. आज सोमवार घेऊन आला. काल त्याने आपल्याबरोबर रविवारला आणले होते. त्याच्या मनात आले - आपण या सूर्यालाच जाऊन गाठले तर! तो नक्की आपल्याला त्याचा पत्ता देईल. त्यालाच भेटावे. तो रोज पूर्वेकडील टेकडीमागून येतो आणि पश्चिमेकडील जंगलात जाऊन लपतो. आपण त्या



जंगलात जावे आणि तिथेच त्याला गाठावे. विचार पक्का झाला. केव्हा एकदा संध्याकाळ होते असे त्याला झाले.

सूर्य मावळतीला टेकला. आनंदही धावत सुटला. तो त्या जंगलात शिरला. एकदम सूर्य दिसेनासा झाला. पळतापळता हाक मारून तो म्हणाला, "सूर्या रे सूर्या, तू कुठं लपला आहेस ?"

एका पाठोपाठ त्याने अनेक हाका मारल्या. प्रतिध्वनी उमटत राहिला. न थांबता आनंद धावतच राहिला.

अखेर तो थकला. धापा टाकत एके ठिकाणी उभा राहिला. दिवस मावळून अंधार पडू लागला होता. त्याला जवळच एक मुंग्यांचे वारूळ दिसले. त्यांची एक रांग वारुळाकडे जात होती. त्या कसल्यातरी कामात गुंग होत्या. जवळ जाऊन त्याने विचारले, "बायांनो, सूर्य कुठं राहतो हे तुम्हांला माहीत आहे का ?"

न थांबता, चालता चालताच एक मुंगी त्याला म्हणाली, "नाही रे बाबा, आम्हांला माहीत नाही. आम्ही फार कामात आहोत. पावसाळा तोंडावर आला आहे. आम्हांला साखर, गूळ, धान्य या सगळ्या गोष्टींची बेगमी करायची आहे. तू बापडा पुढं जा अन् कोणाला तरी विचार."

आनंद पुढे चालला . जवळच एका झाडावर त्याला मधमाशांचे एक पोळे

दिसले. त्या पोळ्यासभोवार मधमाशा घिरट्या घालत होत्या. जवळ जाऊन त्याने विचारले, "सूर्य कुठं राहतो हे तुम्हांला माहीत आहे का ?"

दोघी-तिघी एकदम म्हणाल्या, "नाही रे बाबा, आम्हांला सवडच कुठं आहे, कोण कुठं राहतो हे बघायला ? आम्ही मध गोळा करण्यात गुंग आहोत. तू पुढं जाऊन दुसऱ्या कोणाला तरी विचार."

आनंद बापडा पुढे जाऊ लागला. जवळच एक नदी लागली. नदी संथ वाहत होती. तिच्या दोन्ही बाजूंना हिरवीगार पिके डोलत होती. ती दूरवर वाहताना दिसली. त्याला वाटले तिला कदाचित माहीत असेल. आनंदला एक आशेचा धागा मिळला. जवळ जाऊन त्याने विचारले, "गंगामाई, गंगामाई, अग जरा थांब. सूर्य कुठं राहतो हे तुला ठाऊक आहे का ?"

वाहता वाहता नदी म्हणाली, "नाही रे बाबा, मला माहीत. मी सारखी कामात आहे. मी वाहायची थांबले तर शेतं कशी पिकणार ? शेतं पिकली नाहीत, तर लोकांना धान्य कोठून मिळणार ? असं कर. तू पुढं जा आणि दुसऱ्या कोणाला तरी विचार."



एवढ्यात त्याचे लक्ष एका बाजूला उभ्या असलेल्या लांडग्याकडे गेले.

थोडे पुढे जाऊन त्यांने विचारले, "लांडगोबा, लांडगोबा, तुला सूर्याचं घर आहे का ठाऊक ?"

जिभल्या चाटत तो म्हणाला, " हो तर! मी रानावनात हिंडतो. मला सगळं माहीत आहे. ये माझ्याबरोबर. तुला मी त्याच्याकडं घेऊन जातो."

आनंद पुढे जाणार, इतक्यात ठॉक ठॉक करत एका झाडावर बसलेला सुतारपक्षी आपले काम थांबवून लगबगीने त्याच्याजवळ गेला. त्याच्या कानाशी गुणगुणत म्हणाला, "सांभाळ रे बाबा! हा लांडगा तुला खाऊन टाकील."

आनंद घाबरला. काय करावे हे न कळून तो गोंधळून गेला. सुतारपक्ष्याने त्याला विचारले, "तुझं काय काम आहे ? कशासाठी तूं इथं आला आहेस ?"

"मला सूर्याला भेटायचंय."

"सूर्याला ? आणि ते कशाला ?"

आनंद म्हणाला, " रविवार त्याचा मित्र आहे. मला रविवार फार आवडतो. तो माझी नि रविवारची गाठ घालून देईल. मग आम्ही खूप खूप खेळू."

तो पक्षी बोलला, "वेडा रे, वेडा! सूर्य तर कधीच सुटी घेत नाही. तो तुझी आणि रविवारची कशी गाठ घालून देईल ?"



आनंदने विचारले, "का नाही गाठ घालून देणार ?"

पक्षी म्हणाला, "अरे, आठवड्यातले सहा दिवस जो काम करतो, त्यालाच रविवार भेटतो. तुला रविवार भेटावा असं वाटत असेल, तर आधी तू सहा दिवस काम कर."

आनंदला हे पटले. अंधार पडतच होता. तो लगेच मागे वळला आणि रात्र व्हायच्या आधी घरी आला. सकाळ कधी होते याची वाट बघत तो झोपी गेला.

त्याने मनात ठरवले होते – सोमवार ते शनिवार भरपूर काम करायचे.

सकाळ झाली. अंगावरचे पांघरूण दूर करत त्याला आई म्हणाली, "आनंदा, अरे ऊठ, आज काही रविवार नाही. सोमवार आहे."

स्वप्नातून जागा होतो म्हणाला, "बरं झालं उठवलंस. आज मला खूप अभ्यास करायचाय."

**शब्दार्थ :** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**मावळती** – पश्चिम दिशा. **प्रतिध्वनी** – पडसाद; उलटून आलेला आवाज.
**बेगमी** – तरतूद; संग्रह. **तोंडावर येणे** – अगदी जवळ येणे.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१. आपण सूर्यालाच जाऊन भेटावे असे आनंदला का वाटले ?

२. सूर्याला शोधण्यासाठी निघाल्यावर वाटेत त्याला कोणकोण भेटले ?

३. त्याला योग्य सल्ला कोणी व काय दिला ?

४. (अ) मुंगीच्या घराला 'वारूळ' म्हणतात. पुढील प्राणी व पक्षी यांच्या राहण्याच्या ठिकाणांची नावे सांगा :
**कोंबड्या, घोडे, गाई-म्हशी,** चिमण्या, उंदीर.

(आ) या धड्यात 'पाठोपाठ' असा एक जोडशब्द आला आहे. अशाच प्रकारचे आणखी काही शब्द सुचवा व त्यांचा वाक्यात उपयोग करा.

(इ) गावानजीक एखादा किल्ला असल्यास तेथे किंवा एखाद्या मोठ्या मंदिराच्या गाभाऱ्यात जाऊन 'मी अभ्यास करणार' हे वाक्य मोठ्याने ओरडून म्हणा आणि कानांवर येणाऱ्या प्रतिध्वनीचा आनंद लुटा.

# ३१. माकडवाला



माकडवाला घेऊन येई,
देवजी धसाड्या भागाबाई.

लगीन लागलं सातार्‍याला,
पत्र लिहून म्हातार्‍याला.

चौबाजूंनी आला आहेर,
भागाबाईचं पुणं माहेर.

देवजी पैलवान कोल्हापुरी,
भागाबाई जिवाची अस्तुरी.

कोट देवजीच्या अंगात,
शिवलाया नाना रंगांत.

भागा बघून वाजवी टाळी,
शोभे अंगी जरीची चोळी.

तिच्या गळ्यात कसली दोरी ?
देवजीनं घातली गळसरी.

सुटी संपली, जातो सैन्यात,
भागा रुसून बसे कोपर्‍यात.

म्हणे "साडी नवीन आणीन,
रुसवा तुझा मी काढीन."

पेटीमदी देवजी चालतो,
पब्लिकला सलामी देतो.

पैसे मोजी माकडवाला,
निघे बघा पुढच्या गावाला.

**शब्दार्थ:** * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**धसाडघा** – लठ्ठ, जाडजूड. **आहेर** – भेटवस्तू. **अस्तुरी** – बायको. **गळसरी** – गळ्यात घालायची सरी–एक दागिना.

**प्रश्न व स्वाध्याय:**

१. देवजी व भागाबाई ही कोणाची नावे आहेत ?

२. त्यांच्या पोशाखांचे वर्णन करा.

३. भागाबाई कोणावर रुसली व का ?

४. देवजीच्या अंगातला कोट अनेक ठिगळांचा आहे हे कशावरून दिसून येते ?

५. 'राबणारा एक, कमावणारा दुसराच', असे कोणत्या ओळींतून जाणवले ?

६. वर्गातील एकाने माकडवाला व्हावे व हावभावांसह हा खेळ आळीपाळीने करून दाखवावा.

# ३२. भाकरीची गोष्ट

शरद आपल्या आजोळी खेड्यात आला होता. ते दिवस सुगीचे होते. कापणी-मळणी सुरू होती. कामाची नुसती धमाल होती. अशा वेळी जो तो शेतावरच असे. घरात कोणी बसत नसे.

शरदही आपल्या आजोबांच्या बरोबर शेतावर गेला. ज्वारीची कापणी चालू होती. आल्याआल्या आजोबा आपल्या कामाला लागले. होता होता दुपार झाली. काम थांबवून आजोबा विहिरीवर आले. शरद झाडाच्या सावलीत बसला होता.त्याला हाक दिली.तो आल्यावर दोघे विहिरीकडे गेले. पाणी काढले. हातपाय धुतले. विहिरीजवळच झाडाच्या सावलीत दोघेही जेवायला बसले. सकाळी घरून जेवण बरोबर आणले होते. आजोबांनी दोघांचेही वाढून घेतले.



थोड्या वेळाने अर्धी भाकरी टाकून शरद उठला. आजोबा म्हणाले, "का रे, भाकरी का टाकलीस ?"

शरद म्हणाला, "माझं पोट भरलं. पुरे मला."

यावर आजोबा म्हणाले, "मग वेड्या, जेवढं खायचं होतं तेवढंच नाही का घ्यायचं ? अन्न टाकून असं उठू नये. अन्न वाया घालवू नये."

शरद हसून म्हणाला, "आजोबा, असं किती अन्न वाया जाणार आहे ? मी तर फक्त अर्धी भाकरी टाकून उठलो."

आजोबा म्हणाले, "अरे, अर्धी असो की कोरभर. तुझ्यासारख्या लाखो मुलांनी अशी अर्धी भाकरी टाकली, तर किती अन्न वाया जाईल ? आणि भाकरीसाठी किती कष्ट करावे लागतात, किती घाम गाळावा लागतो याची कल्पना आहे का तुला ? ती सहजासहजी मिळत नाही."

हे ऐकून तो पुन्हा खाली बसला आणि खाऊ लागला. आजोबा म्हणाले, "तू नेहमी म्हणतोस ना, गोष्ट सांगा, गोष्ट सांगा. आज मी तुला भाकरीचीच गोष्ट सागतो."

"सांगा, सांगा." असं म्हणून शरद गोष्ट ऐकण्यासाठी अधीर झाला.

गोष्ट सांगायच्या आधी आजोबांनी विचारले, "भाकरी कशाची करतात ?"

तो पटकन म्हणाला, "ज्वारीची किंवा बाजरीची."

"ही ज्वारी किंवा बाजरी कुठून येते ?"

शरद म्हणाला, "ज्वारी, बाजरी दुकानात मिळते."

"ती दुकानात कुठून येते ?"

"त्यात काय अवघड ?" असे म्हणून शरद म्हणाला, "ती शेतातून येते."

"ती शेतात कशी येते ?"

इथे मात्र शरद अडला. तो आजोबांकडे बघतच राहिला.

"नाही ना ठाऊक तुला ? ऐक तर मग." असे म्हणून आजोबा सांगू लागले, "त्याचं असं आहे–आधी जमीन नांगरायची. मातीची ढेकळं फुटण्यासाठी कुळव फिरवायचा."

"हां, मग पेरायचं ना ?"

आजोबा म्हणाले, "लगेच पेरायचं नाही. ढेकळं फोडून जमीन सारखी झाली, की मग खत घालायचं आणि पावसाची वाट बघायची. पुरेसा पाऊस पडला, की पेरणी करायची. पेरणी झाली, की मग हिरवी हिरवी रोपं उगवतील. ती मोठी होतील. ती मोठी झाली, की मग त्यांना कणसं लागतील."

"कणसं लागली, की मग ती कापायची ना ?"

आजोबा म्हणाले, "लगेच कापायची नाहीत. अरे, आधी भांगलण करावी लागते."





शरदने विचारले, "भांगलण म्हणजे काय ?"

आजोबा म्हणाले, "खुरप्यानं जमिनीतील तण काढायचं. प्रत्येक ताटाभोवतालची जमीन भुसभुशीत करायची. म्हणजे मग ताटं जोमानं वाढतात. कणसंही मोठी होतात. एकेक दाणा मोत्यासारखा दिसू लागतो. ही कणसं निबर झाली, की मग कापणी करायची. सगळी कणसं खळ्यावर न्यायची. पात घालून मळणी करायची. मग या दाण्यांना वारं द्यायचं."

शरदनं विचारलं, " वारं द्यायचं म्हणजे काय ? "

आजोबा म्हणाले, "खळ्यातलं धान्य सुपात घेऊन उंचावर उभं राहायचं. वारा आला की सुपातलं धान्य हळूहळू खाली सोडायचं. वाऱ्यानं धान्यातला कोंडा, कूस उडून जातं आणि मग टपोरे दाणे खाली पडतात. हे दाणे पोत्यांत भरायचे आणि मग पोती घरी आणायची."

"की भाकरी मिळते ना ?"

आजोबा म्हणाले, "लगेच कशी भाकरी मिळेल ? हे दाणे दळायचे. म्हणजे त्यांचं पीठ होतं आणि मग त्या पीठाची भाकरी करायची."

शरद म्हणाला, "बाप रे! बरेच कष्ट करावे लागतात की! "

आजोबा म्हणाले, "तर मग ! जमीन नांगरावी लागते, कुळवावी लागते, खत घालावं लागतं, भांगलण करावी लागते. अशी मशागत करावी, तेव्हा धान्य घरात येतं आणि म्हणून अन्न वाया जाऊ देणं योग्य नाही."

शरद म्हणाला, "आजपासून मी पानात काही टाकणार नाही."



**शब्दार्थ :** **********************..********

**घाम गाळणे** – खूप कष्ट करणे. **अधीर** – उतावीळ; उत्सुक. **निबर** – जून.
**मशागत** – कष्ट; श्रम; निगा.

**प्रश्न व स्वाध्याय :**

१.'मी तर फक्त अर्धी भाकरी टाकून उठलो.' असे म्हटल्यावर आजोबा त्याला काय म्हणाले ?

२. खाली दिलेल्या शब्दांचा योग्य क्रम लावून ते पुन्हा लिहा:
मळणी, नांगरट, खत, कुळव, कणसे, दळणे, भांगलण.

३. आजोबांनी सांगितलेली भाकरीची गोष्ट तुम्ही तुमच्या शब्दांत वर्गापुढे सांगा.

४.(अ) खालील शब्दांना दुसरे योग्य शब्द द्या:
गोष्ट, भाकरी, लाखो, कूस.

(आ) 'ज्वारी', 'बाजरी' ही धान्यांची नावे आहेत. तुम्हांला माहीत असलेल्या धान्यांची आणखी नावे सांगा.

५. शरद व त्याचे आजोबा यांच्यामधील बोलणे संवादरूपाने वर्गापुढे सादर करा.

गाणी

## किसान गीत

धरतीची आम्ही लेकरं । भाग्यवान
धरतीची आम्ही लेकरं ॥ ध्रु. ॥

शेतावर जाऊ या । सांगाती गाऊ या ।
रानीवनी गाती जशी रानपाखरं ॥ १ ॥

मेहनत जिमनीवरी । केली वरीसभरी ।
आज आलं फळ त्याचं डुले शिवार ॥ २ ॥

शाळु, जुंधळा मोती । चमचम् चकमकत्याती ।
मोत्यांची सालभरी खाऊ भाकर ॥ ३ ॥

नाही धनी येथ कुणी, नाही चाकर ।
या रे सारे;अन्यायाला देऊ ठोकर ॥ ४ ॥

धरतीची आम्ही लेकरं । भाग्यवान ।
धरतीची आम्ही लेकरं ॥



# वल्हवा रे नाव

'वल्हवा रे, वल्हवा रे, वल्हवा रे नाव,'

'वल्हवली ।'

'नौका चाले कशी जलावरी,'

'जलावरी, जलावरी'

'आहे सारा भार मुलांवरी,'

'मुलांवरी, मुलांवरी'

'लहान वीर,' 'महान धीर'

'जोसात नाव आता वल्हवा रे'

'वल्हवली ।'

'मोकाट पिसाट वारा आला,'

'येउ द्या रे, येउ द्या रे'

'डोंगर-मापाच्या लाटा आल्या,'

'येउ द्या रे, येउ द्या रे'

'छाती अफाट,' 'झेलेल लाट,'

'रोखील वादळ, वल्हवा रे'

'वल्हवली ।'

'झेंडा माथ्यावर तीन रंगी,'

'तीन रंगी, तीन रंगी'

'संचारला जोम नव अंगी,'

'नव अंगी, नव अंगी'

'बोले कसा,' 'डोले कसा,'

'वैर्यानि नाव आता वल्हवा रे'

'वल्हवली ।'



# पुसू नका

जात कोणती पुसू नका, धर्म कोणता पुसू नका,
उद्यानातिल फुलास त्याचा रंग कोणता पुसू नका,

पुसू नका.

हिरवा चाफा, कमळ निळे, सुखद सुमांचे गंध-मळे,
एकच माळी या सर्वांचा नाव तयाचे पुसू नका;

पुसू नका.

सद्धर्माचा एकच न्याय, कष्टाचा एकच अध्याय,
डाव्या-उजव्या करांत काही, भेद मानुनी फसू नका;

पुसू नका.

रहिम दयाळू तसाच राम, मशीद–मंदिर मंगल धाम,
जपुनि शांतिचा मंत्र सुखाने एक दुजाला डसू नका,

पुसू नका.

जन्मा आलो मुले म्हणून, भरतभूमिच्या कुशीमधून,
अभेद आम्ही, अजिंक्य आम्ही, नाव आमुचे पुसू नका;

पुसू नका.



